


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष तिसरें
अंक अकरावा

# नवभारत

ऑगस्ट
१९५०

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# ' नवभारत ', ऑगस्ट १९५०

## लेखक-परिचय

[ या अंकांतील खालील लेखकांशिवाय बाकीच्या लेखकांचे लेख ' नवभारतां 'त या वर्षी यापूर्वी आले असून त्या त्या वेळीं त्यांचा परिचय दिला आहे.—का. सं. ]

**प्रा. कृ. म. खाड्ये**— (पुणें)–वाडिया कॉलेजचे व महाराष्ट्र ए. सोसायटीच्या कॉलेजचे माजी प्राचार्य. इंग्रजी वाङ्मय व भाषाशास्त्र यांतील तज्ज्ञ. मुंबई विश्वविद्यालयाच्या कार्यकारिणीचे सदस्य.

**प्रा. जयंत जोग**— औरंगाबाद येथील डॉ. आंबडेकर त्यांनीं स्थापन केलेल्या कॉलिजमध्यें इंग्रजी व मराठी या विषयांचे प्राध्यापक.

**प्रा. नी. र. वऱ्हाडपांडे**—एम्. ए., बी. लिट्. ( ऑक्सफर्ड ) —नवी दिल्ली येथें संरक्षणविषयक वैज्ञानिक संघटने-(Defence Science Organization ) च्या मनोविज्ञानविषयक संशोधनशाखे–( Psychological Research Wing ) मध्यें प्रमुख मानसशास्त्रज्ञ. ' कूजन ', ' सुखदुःखविवेक ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. के. ए. पोतदार**—नागपूरच्या ' तरुण भारताचे ' सह-संपादक.

**श्री. शं. ल. चिटणीस**—मुंबईच्या ' लोकमान्या ' चे उपसंपादक.

---

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

संचालक व संपादकमंडळांतील सर्व व्यक्ती यांचेंहि सर्व विषयांत मतैक्य आहे, असें नाहीं. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधीं सदृश अशा दृष्टिकोनानेंच त्यांना एकत्र आणलें आहे. तथापि प्रत्येकाचें व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होतां, विकास व्हावा या दृष्टीनेंच त्यांचें सहकार्य राहील. प्रत्यक व्यक्ति आपल्या नांवानें प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. मुकुल कलार्थी

# महादेवभाई देसाई

[ श्री. महादेवभाई गेल्याला येत्या १५ ऑगस्टला आठ वर्षें होतील. गांधी-युगांतील गुजरातनें हिंदुस्थानला जीं नररत्नें अर्पण केलीं, त्यांतील कै. महादेवभाई हें एक अग्रगण्य रत्न होय. त्यांचें अंतःकरण भक्ताचें होतें. गांधीजींनीं त्यांचें वर्णन आपल्या सूत्रमय व अर्थघन पद्धतीनें एका वाक्यांत केल्याचें " हरिजन "च्या वाचकांना आठवतच असेल—" He reduced himself to zero. " महादेवभाईंनीं स्वतःला शून्यवत् बनवून आपलें सर्वस्व—व्यक्तित्वासह सर्वस्व—बापूंच्या व्यक्तित्वांत सामावून टाकलें होतें. त्यांची ही भक्तिमयता त्यांच्या गुजराती लिखाणांत भरून राहिलेली आहे. त्यांच्या " डायरी " चे तीन खंड आणि इतर कित्येक लेख याची साक्ष देतात. गांधीजींच्या ' रहस्य-मंत्र्या ' ( Private Secretary ) चें काम अपूर्व समरसतेनें केल्यामुळें त्यांना अखिल भारतीय महत्त्व प्राप्त झालें असलें तरी एक जिवंत कलाप्रेमी व सौंदर्यलक्षी साहित्यकार म्हणूनहि ते गुजरातमध्यें ओळखले जातात. त्यांच्या सार्वजनिक जीवनाइतकेंच त्यांचें वैयक्तिक जीवनहि भावनापूर्ण होतें. पण जेथें तात्त्विक सिद्धान्ताचा प्रश्न असेल तेथें ते अत्यंत दृढ असत. त्यांच्या स्वभावाचा हा सकृत्-दर्शनीं विरोधात्मक वाटणारा विशेष त्यांच्या मुलानें—नारायणभाईंनीं—आपल्या संस्मरणांत " शिक्षण अने साहित्य " मासिकांत नमूद केलेला आहे. त्यांच्या भक्तजीवनाला साजेसेंच मरणहि त्यांना लाभलें. बा-बापूंच्या चरणांशीं त्यांनीं आपला देह ठेवला. तो सर्व करुणोदात्त प्रसंग " आमच्या बा " या पुस्तकांत ( आणि आतां हिंदींतून झालेल्या श्री. सुशीला नय्यर यांच्या " बापूकी कारावास-कहानी " नामक आगाखान महालांतील रोजनिशींत ) सविस्तर वर्णन केलेला आहे. अशा या गांधीजींच्या अपूर्व ' रहस्य-मंत्र्या ' च्या सातव्या वार्षिक श्राद्धतिथीच्या निमित्तानें त्यांच्या जीवनाचें व व्यक्तिमत्त्वाचें संक्षिप्त रेखाचित्र ज्यांत सहृदयतेनें रेखाटलें आहे, अशा श्री. कलार्थी यांच्या लेखाचा अनुवाद पुढें दिला आहे. मूळ लेख गुजरातींत असून तो ता. १५–८–४९ रोजीं स्व. महादेवभाईंच्या सहाव्या वार्षिक श्राद्धतिथीनिमित्त श्री. महादेव देसाई समाजसेवा–महाविद्यालयांत निबंधरूपानें वाचण्यांत आला होता. ]

१५ ऑगस्ट या तारखेला कोणत्या नांवानें संबोधावें ? एका बाजूनें स्वातंत्र्याचा उत्सव आणि दुसरीकडून महादेवभाईंची पुण्यतिथि. ईश्वराची गतीहि अनाकलनीय आहे. स्वातंत्र्याच्या उन्मादांत आपण असंयत होऊं नये म्हणून मंगलमय, शुचिमय परमात्म्यानें या मंगल दिवसाशीं महादेवभाईंची पुण्यतिथि जोडून दिली. त्यामुळें स्वाभाविकपणेंच आजच्या दिवशीं आपल्या जीवनांत मंगलमयता व संयमितता मिसळली जाऊन त्यांतून स्वर्गीय आनंदच स्फुरेल. महादेवभाईंचें देहावसान झालें तेव्हां बापूजी तार लिहवावयास बसले. बापूजी दुःखित कंठानें म्हणाले : " दिलगीर आहे." मग बापूजी एकदम थांबले व म्हणाले : " अशा उदात्त मृत्यूंची बातमी देतांना मी दिलगीर कां व्हावें ? नाहीं, ' दिलगीर आहे ' हे शब्द खोडून टाका आणि लिहा कीं ' महादेवभाई एकाएकीं मरण पावले ' " !



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तेव्हां या भव्य प्रसंगानें उद्विग्न बनण्याऐवजीं त्यांच्या उच्च व सेवाभावी जीवनांतून कांहीं तरी बोध व प्रेरणा मिळवून आपलें जीवन त्या मार्गानें स्पंदित करावें यांतच आजच्या पवित्र दिवसाची सार्थकता आहे.

## सुरुवातीचें जीवन

महादेवभाईंचा जन्म १ जानेवारी १८९२ रोजीं सुरत जिल्ह्यांतील ओलपाड तालुक्यांत दिहेण गांवीं झाला. अभ्यासकाळापासूनच बुद्धीची चमक दाखवून त्यांनीं थेट कॉलेजच्या शेवटच्या वर्षापर्यंत शिष्यवृत्त्या मिळविल्या होत्या; आणि उत्तम इंग्रजी व गुजरातीव्यतिरिक्त बंगाली व मराठी भाषांचें ज्ञानहि त्यांना असल्यामुळें बी. ए. झाल्यावर लगेच त्यांना सेक्रेटरिएटमध्यें ओरिएन्टल ट्रान्सलेटरच्या ऑफिसांत जागा मिळाली. या कामाबरोबरच कायद्याचा अभ्यास करुन ते एल्एल्. बी. झाले आणि मग नोकरी सोडून अमदाबादेंत एक-दोन वर्षें वकिली केल्यावर सरकारच्या को-ऑपरेटिव्ह सोसायटीच्या खात्यांत इन्स्पेक्टरच्या हुद्दयावर आले. तेथें ग्रामीण जनतेच्या खऱ्या प्रश्नांचें ज्ञान त्यांना प्राप्त झालें. तेवढ्यांत इ. स. १९१५ मध्यें बापूजी आफ्रिकेहून आले. त्यांच्या तात्त्विक सिद्धान्तांनीं आकर्षिले जाऊन त्यांनीं आपली उज्ज्वल भविष्यकाळ असलेली नोकरी सोडली. बापूंच्या आश्रमांत ते दाखल झाले, व त्यांचे अन्तेवासी म्हणून राहिले. त्यानंतरचें त्यांचें जीवन बापूंच्या जीवनाबरोबरच वाहात गेलें.

## गुणनिधान आत्मा

महादेवभाई बापूंना येऊन मिळाले तेव्हां इतके सुंदर दिसत व त्यांच्यांत इतकी प्रफुल्लता होती कीं बापू त्यांच्याबद्दल म्हणत : ‘ महादेव गुलाबाचें फूल आहे. ’ त्या वेळीं श्रीमती नायडूंनीं त्यांचें ‘ गुले गुजराथ ’ ( गुजरातचा गुलाब ) असें नांव ठेवलें होतें.

ते अगदीं तरुण वयापासून साहित्याचे रसिक होते. देशोदेशींच्या साहित्याचें त्यांचें वाचनहि विशाल होतें. आणि जगत्साहित्यांतील अद्यतन कृति व विचार यांचा त्यांना चांगला परिचय असे. मीरेच्या भक्तीसारख्या अनन्यभक्तीनें त्यांनीं आपलें जीवनसर्वस्व गांधीजींच्या चरणीं वाहिलें व त्यांच्यांतच जणूं ते स्वतः सामावून गेले. जीविताचा क्षणन्क्षण स्वराज्यसाधनेच्या तपांत विलीन करून देशकार्याच्या सहाणेवर चंदनाप्रमाणें घासल्या गेलेल्या त्यांच्या जीवनाचा सुगंधच मात्र आतां राहिला आहे.

कोठलाहि अलंकार न वापरतां त्यांचें वर्णन करावयाचें झाल्यास असें म्हणतां येईल कीं, उमदें दर्शन, उमदें वर्तन व त्याहूनहि जास्त उमदें शील म्हणजेच महादेवभाई. ते भावनाप्रधान वृत्तीचे आणि कांहीं अजब तऱ्हेची स्वभावाची गोडी असलेले गृहस्थ होते. स्नेहाचा पडसाद त्यांच्या अंतरंगांत ताबडतोब उमटत असे. समभाव व समजूतदारपणा हीं त्यांच्यांत भरून राहिलीं होतीं; आणि त्यांची उदारताहि अपार होती. पण त्यांचा प्रेमळ स्वभाव व असामान्य कार्यक्षमता यांपेक्षांहि त्यांच्या अपार नम्रतेनें लोक त्यांच्याकडे अधिकच आकर्षिले जात असत.. अशा शक्तिशाली पुरुषानें शेवटपर्यंत अढळ निष्ठेनें ज्याची सेवा केली त्याच्या चरणीं जीवनाच्या आरंभींच आपलें सर्वस्व अर्पण करायला प्रेरित व्हावें यांत आश्चर्य करण्यासारखें काय आहे ! बापूजींनींहि योग्यच म्हटलें आहे : “ मला कोणीं विचारलें कीं, महादेवच्या चारित्र्याचें सर्वांत अधिक उमदें लक्षण कोणतें, तर मी म्हणेन कीं प्रसंग आल्यास शून्यवत् बनण्याची त्यांची शक्ति. ”

बापूंच्या जीवनप्रणालीचें सखोल ज्ञान व तिची तर्कशुद्ध मीमांसा हें महादेवभाईंचें अमूल्य भांडवल होतें.

महादेवभाई पुष्कळ वेळां म्हणत : “ जीवनांतील माझी एकमेव प्रार्थना ही आहे कीं, बापूंची सेवा करतां करतां मरावें”. महादेवभाईंना हें बरोबर माहीत होतें कीं,बापूंच्या बरोबर राहणें म्हणजे कांहीं साधीसुधी गोष्ट नाहीं; त्यासाठीं खोल तपस्येची जरूरी आहे. म्हणूनच महादेवभाई म्हणत : “ बापूंच्या बरोबर राहणें म्हणजे ज्वालामुखीच्या तोंडावर राहण्यासारखें आहे. ज्वालामुखी केव्हां भडकेल आणि आपली राखरांगोळी करील तें कोणाला सांगतां यावयाचें नाहीं. ”



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# महादेवभाई देसाई

अनेक वर्षे आपल्यापैकीं पुष्कळांच्या मनांत "हरिजन" पत्र बापूंच्या लेखणीप्रमाणेंच महादेवभाईंच्या लेखणीशींहि निगडित झालेलें आहे. या संबंधांत एक प्रसंग आठवतो. महादेवभाईंच्या चप्पला बापूंच्या कुटीपाशीं पडल्या होत्या. त्या चप्पलांवर 'एम्. डी.' अशीं महादेवभाईंच्या नांवाचीं इंग्रजी आद्याक्षरें कोरलेलीं होतीं. "हरिजन" मध्यें येणाऱ्या आपल्या लेखांच्या खालींहि महादेवभाई हींच अक्षरें लिहीत, व ज्या लिखाणाखालीं M.D. अशीं अक्षरें असतील, तें महादेवभाईंचेंच होय हें हरिजनांच्या सर्व वाचकांना चांगलें माहीत झालेलें होतें. अशीं अक्षरें असलेल्या चप्पला पाहून सरदारांनीं आपल्या लाक्षणिक पद्धतीनें विनोदानें म्हटलें : "महादेव, मेहेरबानी करून आपल्या चप्पला येथें ठेवूं नका. नाहीं तर येथें येणाऱ्यांपैकीं एखाद्याला वाटेल कीं हें कांहीं तरी नवीन प्रकारचें 'हरिजन' पत्र तर नाहीं ना सुरू झालें ?"

बापूंच्या मतें महादेवभाई आदर्श मंत्री (चिटणीस) होते. एकदां महादेवभाईंचें वर्णन करतांना बापूंनीं त्यांच्याविषयीं म्हटलें होतें कीं, "पुत्र, मंत्री व प्रेमिक हे तिन्ही एकत्र सामावून ते बनलेले आहेत." दुसऱ्या एका प्रसंगीं त्यांनीं, आपल्यामधील संबंध हिन्दु पतिपत्नींच्या सारखा म्हणजे एकमेकाला पूरक व अचल आहे, असें म्हटलें होतें. तें "आत्म्यांचें लग्न" होतें.

महादेवभाई बापूजींना हातानें कपडे धुऊं देत नसत. बापूजी जेव्हां खडबडीत खादीचा फेटा बांधीत, जाड्या खादीचें धोतर व अंगरखा घालीत तेव्हां महादेवभाई बापूंचे कपडे धूत असत. त्याशिवाय स्वयंपाक करीत, बापूंच्या वतीनें लोकांना भेटत, पत्रव्यवहाराचें काम सांभाळीत आणि "यंग इंडिया" साठीं लेखहि लिहीत. महादेवभाईंचा एक मोठा गुण असा होता कीं, त्यांच्यावर जें कांहीं काम सोंपविण्यांत येई तें करायला ते अगदीं तयार असत व अगदीं उत्साहानें ते करीत. म्हणूनच बापूंच्या शब्दांत म्हणावयाचें तर, "ते अशा प्रकारें एक चांगले लेखक, चांगले स्वयंपाकी व चांगले मजूर बनले."

सौंदर्ययुक्त साधेपणा, स्वच्छता व व्यवस्थितपणा यांबद्दल त्यांचा फार आग्रह असे. वरवरच्या टापटिपीऐवजीं ते हस्तकला जास्त पसंत करीत. आरडाओरड व धांवपळ चालूं असतांहि एकाग्रता ठेवण्याची त्यांची शक्ति अपूर्व होती.

## बापूमय जीवन

महादेवभाईंचें सर्व शरीर जणूं कांहीं हृदयाचेंच बनलेलें होतें. त्यांच्या डोळ्यांत, स्पर्शांत, वाणींत, त्यांच्या बुद्धींत, त्यांच्या चिकाटींत आणि प्रेमांत, त्यांच्या प्रत्येक क्रियेंत हृदयाचाच सरळ स्पर्श होत असे. पण तें हृदयहि त्यांचें स्वतःचें राहिलें नव्हतें. तें बापूंशीं मिळून गेलेलें होतें. व्यक्ति व विचार यांच्याकडे ते बापूंच्याच नजरेनें बघूं शकत. ज्यांना बापूंनीं आपलें म्हटलें, मित्र मानलें, मान दिला तो महादेवभाईंच्या प्रेमाचा, आतिथ्याचा व कीर्तिगानाचा विषय झालाच म्हणून समजावें. मग त्या व्यक्तीचे विचार कांहींहि असोत. वर म्हटल्याप्रमाणें बापू महादेवभाईंचा प्राणवायु होते. आणि म्हणूनच महादेवभाईंच्या चित्ताच्या संचालक व विरोधक अशा सर्व शक्ती, त्यांची सर्व 'साधन-बल-वचन-चातुरी' बापूंच्या चरणीं समर्पित झालेली होती.

आज महादेवभाईंचें स्मरण करतां करतां कित्येक विचार मनापुढें येऊन उभे राहतात. त्यांचें समग्र जीवन सेवाभावानें व त्यागवृत्तीनें इतकें प्रस्फुरित झालेलें होतें कीं त्यांतील कोणता प्रसंग टाकावा हेंच समजत नाहीं. बापूंविषयीं त्यांनीं जो सेवाभाव व जें प्रेम दाखविलें तें खरोखर अतुल आहे. आज आपल्यांत बापूहि नाहींत. जर महादेवभाई असते तर बापूंविषयीं एक महाभारतच त्यांनीं लिहिलें असतें. बापूंचा व महादेवभाईंचा संबंध हृदयाचा होता. हृदयाची जाणीव स्नेही हृदयालाच होऊं शकते. बापूंचें चरित्र महादेवभाईंनीं लिहिलें असतें तर तें सगळ्या विश्वांत विख्यात झालें असतें आणि बापूंच्या जीवनाचें आपणाला आकलन व्हायला तें साहाय्यरूप बनलें असतें. याचा सबळ पुरावा आपणाला त्यांच्या डायरीवरून मिळतो. पण बापूंचे चरित्रकार तर बापूंपूर्वींच निघून गेले ! महादेवभाईंच्या मृत्यूनें व्यथित झालेल्या बापूजींनीं म्हटलें होतें : "माझें

[ पुढील मजकूर पान ८ वर पहा ]



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्व. महादेवभाई देसाई : अनु.—श्री. ना. ग. जोशी

# "महादेवभाईंच्या डायरी" मधून

सोमा [1]

टॉमस हार्डीनें Some Crusted Characters म्हणून कित्येक पात्रें रंगविलीं आहेत. असें एक पात्र नाशिकांत भेटलेला बंगाली आचारी होता. ब्रह्मी, मद्रासी, इंग्रजी बोलत असे, सातव्या वेळां सजा होऊन आला होता. धोबी होता. आतां या मालिकेंत येथील सोमाची भर पडली आहे. अमीर व्हायला पैसा पाहिजेच असें नाहीं, असें तो सिद्ध करून दाखवितो आहे. तो ठाकरडा (जातीचा) आहे. घरीं क्वचितच दोन बिघे जमीन असेल. पण तो अमीर आहे. चलाळा येथील आहे. "कापूस सर्वांत उत्तम चलाळाचा, तुरीची डाळ तर उत्तमोत्तम तेथीलच, डाळिंबेंहि चलाळाचीं. धोळक्याचें उगाच नांव पडलें आहे : 'धोळक्याचीं डाळिंबें ! धोळक्याचीं डाळिंबें !' धोळक्यांत कोण डाळिंबें पिकवणारा बसला आहे ? मी सुटून चलाळाला आलों कीं दाखवीन चलाळाला कशीं डाळिंबें होतात तें !" चलाळानंतर मानाचा दुसरा नंबर गुजरातचा येतो. "महाराष्ट्रांत काय आहे ? दगडधोंडे. कोठें आपली गुजरात नि कोठें महाराष्ट्र ! पाहाना हा मारुति. वॉर्डर झालाय, पण शुंभासारखा आहे. आंबे कापायला तीनदां बसला पण सुरी कशी धरायाची तें अजून समजत नाहीं. त्याची बोली पण कशी ? 'इकडे...तिकडे' ! स्वैंपाक करायला मजजवळ शिकला पण तो तसें समजत नाहीं. तुम्हीच सांगा. कढींत साखर घालावयाची असते ? गूळ घालायचा." डाळ शिजली नाहीं तर असें नाहीं म्हणत कीं मी सोडा कमी टाकला ! "वल्लभबाप्पांनीं सोडा कमी दिलावता !" कापूस निवडायला बसला तर म्हणतो : "हा काय कापूस ? असला कापूस पिंजायचा असतो ? हा तिकडचा जळलेला कापूस आहे. ४-५ रुपये भावाचा. पिंजायचा कापूस कसा फक्कड, बोंडें उमललीं कीं वेंचलेला हवा. त्याचे कपडे चांगले होतात, याचे नाहीं होत. मी ६०-६० वार विणायची वर्दी दिल्ये पाहा !" त्यानंतर त्याला खानावळीच्या कामीं लावला. बकरीच्या दुधाचें दहीं आम्ही करतों तें तो रोज पाहतो. खातोहि खरा. पण गाईच्या दुधाचें ज्या दिवशीं तयार केलें होतें त्या दिवशीं आम्ही म्हटलें : "हें दहीं अधिक चांगलें लागलें आहे हां !"; तर तो म्हणतो : "गाढवाच्या लेंड्यांचे पापड होत असतात ? ते ज्याचे व्हायचे त्याचेच होणार." डाळिंबाच्या लागवडीबद्दल अनेक गोष्टी बोलतो—"तुमच्या आश्रमांत डाळिंबें होतात ?". मीं म्हटलें : "चांगलीं नाहीं होत". तर तो म्हणतो : "लागवड चांगली करीत नसाल. पाणी किती देतां ? त्याला आळें करायला हवें, त्याच्या आजूबाजूला खाचर करा, कंबरेइतकें पाणी भरायला

१. 'महादेवभाईनी डायरी' (पु. १ लुं) याचा मराठी अनुवाद श्री. ना. ग. जोशी यांनीं केला असून तो 'नवजीवन' (अहमदाबाद) संस्थेतर्फे प्रसिद्ध होणार आहे. त्यांतूनच हें व पुढचीं अशीं दोन शब्दचित्रें साभार घेतलीं आहेत. जातीय निवाड्यानंतर गांधीजींनीं उपवासाची सूचना दिली तो येरवडा तुरुंगांतील काळ (१९३२). —अनु.









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पाहिजे " इत्यादि. आपला गुन्हा तो कबूल करतो. त्याचा त्याला पश्चात्तापहि होतो आणि म्हणतो : " आतां या जन्मांत कैदेंत नाहीं यायचं. देवानें हातपाय दिले आहेत. कमवून खाऊं. असे कांहीं उपाशी मरणारे आम्ही नाहीं. मी पकडला गेलों— एका मुसलमानानें गुन्हा कबूल करून सर्वांना पकडवून दिलें नि आपण सुटला— त्यापूर्वी थोडेच दिवस एका पाटीदारानें ( पटेलानें ) १८ बिघे जमीन लागवडीला द्यायचें म्हटलें होतें. पण तकदीराची गोष्ट आहे. कोणाचें कवडीचें कर्ज नाहीं. शें-दोनशें रुपये दुसऱ्याकडून मागतों आहे. आम्ही बारैया म्हटले जातों. आम्ही चलाळाचे खरे पण मूळचे आम्ही चरोतरचे."

'वेठियावाड' ( वेठीचें काम ) या शब्दाची उत्पत्ति मला आज सोमानें समजावून दिली. " साहेब, एका पटेल ( कामगारा ) ला सांगितलें कीं 'वाड ( कुंपण ) नीट करून ये.' पटेलानें वेठीच्या धेडाला म्हटलें कीं, 'अरे जा, वाड ( कुंपण ) करून ये.' तो गेला आणि कांटेरी जेमतेम खोंचून आला. पटेल विचारतो : 'अरे वेड्या, वाड ( कुंपण ) करून आलास काय ?' तो म्हणतो : 'वाऱ्याचा सोसाटा आला नाहीं तर तुमच्या नशीबानें कुंपण ( वाड ) उभें राहील, पण वारा जोराचा आला तर मात्र उडूनच जाईल.' तेव्हां तो ( पटेल ) म्हणतो : 'अरे वेड्या, तूं छान वाड ( कुंपण ) केलीस हां ! !' "

**मारुति**

सोमा स्वैंपाक्याचा परिचय करून दिला. मारुति वॉर्डर बापूंच्या सेवेसाठीं ठेवला आहे तो जड बुद्धीचा, अशिक्षित, त्याच्याच भाषेंत 'अडाणी मूर्ख' आजपर्यंत मानला जाई. त्या बिचाऱ्याला मोठ्या मोठ्या कामाची समज येई. आणि आमचा तो अमीर ठाकरडा त्याला पुष्कळ वेळां म्हणे : " किती गांवढळ आहे ! सुरी उलटी पकडतो ती अजून सुलटी पकडायची समजत नाहीं. " हा जड बुद्धीचा अडाणी आज ( १६-४-३२ ) माझ्यापाशीं दुपारचा आला आणि त्यानें जें संभाषण केलें त्यानें माझे डोळे उघडले व आंसवांनीं ओले झाले. मारुतीमध्यें किती कोमलपणा आहे तें मला आजपर्यंत कळलें नाहीं म्हणून मला खेद वाटला.[२]

असहकाऱ्यांची भरती झाल्यामुळें सरकारला जुन्या गुन्हेगारांना सोडायला सुरुवात करावी लागली आहे. जवळजवळ पावणेचारशें कैद्यांची अशी सुटका होईल. मारुति मला बरेच वेळां म्हणाला : " यांत तर पुष्कळ बदमाषहि सरकारनें सोडायला सुरुवात केली, असें कां असावें ? ". " सरकारला त्यांची बदमाषगिरी चालण्यासारखी आहे, आमच्या लोकांची ( असहकाऱ्यांची ) सरकारला चालणार नाहीं ", एवढें त्याला म्हणून मी शान्त राहिलों. या नशीबवान् लोकांत मारुतीचीहि पाळी आली व उद्यां सुटणार असें कळतांच तो माझ्याकडे आला. मला त्यानें बातमी सांगितली. मी म्हटलें : " मारुति, आम्हांला विसरून तर नाहीं ना जाणार ? " मारुतीचा गळा दाटून आला, आणि म्हणाला : " जन्मोजन्मीं पुण्य केलें असेल म्हणून जेलसारख्या जागीं महात्म्यांचें दर्शन झालें ! तें कोण विसरेल ? मी बाहेर असतों तर कधींहि हें दर्शन घडणें शक्यच नव्हतें. याबद्दल मी काय करावें ? माझे आभार मी कसे दाखवावे ? मी गरीब मनुष्य आहें. एक शेत आहे, कशीबशी गुजराण करीत. पण मला महात्म्यांच्या चरणीं कांहीं वाहायची इच्छा आहे. त्यांना कसल्याहि गोष्टीची वाण नाहीं. मागतील तें सरकार व लोक त्यांच्यापुढें खडें करतील अशी स्थिति आहे. पण मला गरीबाला एवढी इच्छा आहे कीं म्यां कांहीं तरी त्यांना पाठवावें. काय पाठवावें तें तुम्हीं मला सुचवा. " मी म्हटलें, " भल्या माणसा, तूं कांहीं पाठवायचेंच नाहींस. तूं येथें प्रेमळपणें काय कमी सेवा केलीस ? " लगेच मारुतीनें उत्तर दिलें : " अरेरे ! त्याला तुम्ही

---

२ महादेवभाई येरवड्याला आल्यावर दुसऱ्याच दिवशींची—११-३-३२—ची नोंद अशी आहे : मारुतिराया बलभीमा तर सकाळ-संध्याकाळ ( बापूंच्या ) चरणावर डोकें टेकून झोंपायला जातो. ( बापू व वल्लभभाईसहित ) मलाहि त्यानें त्रिमूर्तींमध्यें धरला आणि माझ्यापुढेंहि प्रणाम केला. मी म्हटलें : " भल्या गृहस्था, मी तर तुझ्यासारखाच आहे ! "



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सेवा म्हणतां ? महात्मा नसते तरी दुसरी कांहीं कामगिरी केल्याशिवाय भाकरी कोण देणार होतें ? सरकारनें हें काम माझ्यावर सोंपवलें नि मी तें केलें यांत मला काय मोठेपणा ? मोठेपणा तेव्हांच म्हणेन, जेव्हां मी स्वतंत्र असेन नि माझ्या स्वेच्छेनें त्यांची सेवा करीन. मी सेवा करायला लायक कुठें आहे ? ते कुठें ? कोट्यवधी माणसें ज्यांना देवासारखे पूजतात, त्यांनीं स्वतः कैदेंत येऊन आम्हांला सोडवलें ! कलियुगांतलें हें केवढें कौतुक ! त्यांनीं किती कष्ट सहन केले ! त्यांच्या जोडीदारांनीं किती कष्ट सहन केले ! प्यारेलाल होते त्यांनीं बिचाऱ्यांनीं ११ दिवसांचा उपवास केला, तर त्याबद्दल त्यांना शिवीगाळ झाली, परसाकडे किंवा लघवीलासुद्धां दुष्टांनीं त्यांना जाऊं दिलें नाहीं. हें सर्व त्यांनीं कशासाठीं केलें ? अशा प्रकारचे त्यांचे साथी पडले आहेत. त्यांची सेवा माझ्याकडून ती काय होणार ? आतां परत त्यांना बघायला मिळेल कीं नाहीं भगवंताला माहीत ! " असें म्हणून त्यानें दीर्घ उसासा टाकला, आणि फिरून आग्रह करूं लागला : " मला सांगा, भाई, मला सांगा, मी त्यांच्यासाठीं काय पाठवूं ? कांहीं खायचें पाठवूं का म्हणजे माझ्या हातचें त्यांनीं खाल्लें असें मानून मला तृप्ति मिळेल ? " याला उत्तर कसें द्यावें अशा पंचाइतींत वेळ जात होता तेवढ्यांत बापू व वल्लभभाई भेटीसाठीं जेलच्या दरवाजावर गेले होते ते येऊन ठेपले आणि आमचा संवाद थांबला.

### कागावाचें जीवनचरित्र [३]

या पुस्तकाचें अवलोकन " गॉस्पेल ट्रम्पेट "-मध्यें वाचलें. नीला ( नागिणीच्या परिवर्तना ) चा चमत्कार म्हणतां येईल, तसेंच कागावाचेंहि चमत्कार म्हणून वर्णन करतां येईल.

कागावा अद्वितीय आहे. असें म्हणतात कीं आपला जन्म चमत्कार आहे असें तो मानतो. त्याच्या जीवनांत ज्यामुळें असें परिवर्तन घडलें तो ईश्वरकृपेचा चमत्कारच म्हटला पाहिजे. पुरेपूर ईश्वरविमुख बापाचा मुलगा, राख ठेवलेल्या बाईच्या पोटीं जन्मलेला, नाच करणाऱ्या पोरीचें नकोसें असलेलें बालक, अशा या कागावानें आपल्या अगदीं बालपणापासूनच विशुद्ध चारित्र्याबद्दल अद्भुत प्रेम अंगीं बाणविलें वयाच्या एकविसाव्या वर्षीं कागावा टोकियोच्या चाळींत, जपानच्या उतारपेठसारख्या वस्तींत—जेथें हजारों स्त्री-पुरुष सैरावैरा जीवन जगतात तेथें त्यांच्यामध्यें—राहावयास गेला. तेव्हां त्याच्या मित्रांना फार आश्चर्य वाटलें. या अनीतीनें बजबजलेल्या वस्तींत तो पंधरा वर्षें राहिला. आपल्या पत्नीलाहि तो तेथें राहावयास घेऊन गेला. मदतीची आवश्यकता असणाऱ्या कोणालाहि कागावाच्या झोंपडींत राहावयास मिळे. त्याची झोंपडी नेहमीं भरलेली असे. ज्या समाजानें अशा घाणेरड्या व अनीतिमय चाळींना जन्म दिला त्या समाजाला त्यानें आह्वान दिलें. त्यानें गरीब लोकांच्या आर्थिक कलहांत त्यांची बाजू घेतली. कामगारांचा संघ त्यानें निर्माण केला. त्यांची राहाण्याची उत्तम सोय व्हावी व त्यांनीं उच्च जीवन जगूं लागावें म्हणून तो लढला. त्याच्या पत्नीला एका कारखान्यांत मुलींची मुकादम म्हणून रोजचे बारा पैसे मिळत. मुलींना सहा पैसे मिळत. चळवळ करण्याबद्दल कागावाला कारावासाची शिक्षा झाली. पण त्यानें हिंमत सोडली नाहीं. कागावाच्या आसपास वेश्या, चोर, लुटारू, व खुनी गुंड राहात. त्यांच्यामध्यें तो पूर्ण पवित्र राहिला. शेवटीं त्या जुनाट समाजाला त्यानें सुरुंग लावला. टोकिओंत धरणीकंप झाला व आग लागली. शींकवाला नेस्तनाबूत झालें. पण या चाळींना जी त्यानें पद्धत लावून दिली ती या धरणीकंपानें व आगीनें नाहींशी झाली नाहीं. कागावाला दलित लोकांसाठीं झगडा करीतच राहावें लागलें. शेवटीं सरकारनें कागावाला ओळखलें. नुकतीच त्यानें ' ईश्वराच्या राज्या ' ची चळवळ हातीं घेतली आहे. त्याचा प्रयत्न दहा लाख ख्रिस्ती

---

[३] हें व पुढील लिखाण " महादेवभाईंची डायरी " ( पु. ३ ) मधून ' नवजीवन ' कार्यालय ( अहमदाबाद ) यांच्या परवानगीनें घेतलें आहे.—अनु.




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तयार करण्याचा आहे. तो म्हणतो कीं जपानमध्यें अभीष्ट तो फेरफार घडवून आणण्यास दहा लाखांहून कमी संख्या चालणार नाहीं.

एका वैमानिकाची साहसकथा :

जेम्स मॅटर्न नांवाच्या अमेरिकन वैमानिकाच्या साहसाचें वर्णन तर एखाद्या (क्रमिक) वाचनपाठमालेंत धडा म्हणून घालण्यासारखें आहे. आपल्या बालकांकडून अशा साहसाचे धडे जेवढे वाचून घ्यावेत तेवढे थोडेच. कालच (ता. ९–८–३३) बापू बिर्लांच्या हिंमतीविषयीं व समयसूचकतेविषयीं गोष्टी बोलत होते. बिर्ला विमानांतून कराचीला येत होते, आणि हैदराबादला पोंचतांच कांहीं अपघात झाला तेव्हां त्यांनीच अमुक जागा पाहून तेथें विमान खालीं उतरविण्याची विनंति केली.— या मॅटर्नची पुढील हकीकत नमूद करण्यासारखी आहे.

विमानोड्डाणाच्या इतिहासांत लक्षांत ठेवण्यासारखी अतिशय साहसाची कथा रॉयटरच्या मॉस्कोमधील बातमीदारानें कळविली आहे. तरुण जेम्स मॅटर्न अमेरिकन वैमानिक होता. अलास्कांतील नोम विमानतळावर पोंचण्यासाठीं पूर्व सायबेरियांतील खाबारोव्स्क शहर सोडल्यावर थोड्याच वेळांत तो नाहींसा झाला. तीन आठवड्यांनंतर उत्तर ध्रुवाजवळच्या उजाड बर्फमय प्रदेशांत तो जाऊन पडला.

या तीन आठवड्यांत मॅटर्न याला एकदांच मनुष्याचीं चिह्नें पाहावयास मिळालीं, आणि तींहि निराशेच्या कांठावर येऊन पडण्यासारख्या परिस्थितींत. एखादें जाणारें येणारें जहाज सांपडेल या आशेनें तो अनादिर नदीच्या कांठानें भटकत होता. एक दिवस खाद्य शोधीत शोधीत तो नदीपासून दूर गेला. आसपास नजर टाकल्यावर एक होडी प्रवाहांतून खालीं जातांना त्याला दिसली. त्यानें हात हालवून त्या होडीवाल्यांचें लक्ष आपल्याकडे वेधण्याचे पुष्कळ निष्फळ यत्न केले, पण अंतर फार होतें व तो नदीच्या कांठावर येईपर्यंत होडी अदृश्य झाली.

खाबारोव्स्क सोडल्यावर चौदा तासांनीं, पृथ्वीची प्रदक्षिणा करतांना फारच जोखमीच्या जागीं तो असतां, मॅटर्नला कळलें कीं आपल्या विमानांत कांहींतरी बिघाड झाला आहे. 'सेंचरी ऑफ् प्रोग्रेस' नांवाच्या त्याच्या लालरंगी मोनोप्लेन जातीच्या विमानाचें इंजिन जास्त प्रमाणांत तापूं लागलें होतें. इंजिनांतील हा दोष त्याला इतका गंभीर स्वरूपाचा वाटला कीं त्यानें खालीं उतरण्याचा निश्चय केला. अनुकूल जागेच्या शोधांत दोन तास उडत राहिला. पण खालीं इतकी डोंगराळ व खांचखळग्यांची जमीन होती कीं सुरक्षितपणें खालीं उतरण्याची कमीच आशा होती. शिवाय त्या प्रदेशांत मोठमोठ्या दलदली व लहान सरोवरेंहि पुष्कळ होती.

पण आतां काय व्हायचें असेल तें होवो असें म्हणून नशीबाची परीक्षा घेतल्यावांचून सुटका नव्हती. मॅटर्ननें शक्य तें सर्व केलें. पण त्याच्या विमानाचें इंजिन इतकें बिघडलें होतें कीं दुसरा इलाजच राहिला नव्हता. शेवटीं ती खालीं उतरला व विमान आपटून फुटलें. मात्र अंगावर कांहीं ओरखडे निघाले, यावांचून अधिक इजा न होतां तो त्यांतून बचावला.

सोव्हियेत रशियाच्या खूप दूरच्या व अतिशय उजाड प्रदेशांत तो येऊन पडला. तेथें रेनडिअर हरणांना पाळणारे थोडे भटके लोक विखुरलेले राहात होते. अनादिर चुकोटका नांवाची जवळांत जवळची वसाहत तेथून ८० मैल दूर होती.

आठ दिवसपर्यंत तर विमान पडलें होतें त्याच ठिकाणीं तो राहिला. अनादिर नदीच्या काठीं खालींवर फिरण्यांत तो आपला वेळ कंठीत असे. जवळ चॉकोलेट बिस्किटें होतीं तीं तो फार भूक लागे तेव्हां खाई. ती शिदोरीहि तीन दिवसांत संपली. मग स्वतःजवळ असलेल्या बंदुकीनें तो लहानलहान प्राण्यांची शिकार करूं लागला. पण अशी शिकार क्वचितच मिळे व त्याला लंघनें करावीं लागत. नवव्या दिवशीं मॅटर्ननें नक्की ठरविलें कीं तेथें देवदाराच्या जातीचीं सीडार झाडें होतीं त्यांच्या लांकडाची झोंपडी बांधून नदीकाठीं राहावें. असे त्यानें सहा दिवस काढले. पण दिवस जात चालले तशी मदत मिळायची आशा कमी होत गेली. थंडी, भूक व निराशा यांचा परिणाम



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

मनावर व शरीरावर अधिकाधिक होऊं लागला. खाबारोव्स्क सोडल्यानंतर बरोबर पंधरा दिवसांनीं ता. २९ जूनला रात्रीं जेव्हां अगदीं तो निराश झालेला होता तेव्हां चुकची नांवाच्या तेथील रहिवाश्यांच्या दोन होड्या त्याच्या नजरेस पडल्या. त्यानें केलेल्या खुणांकडे त्या होडीवाल्यांचें लक्ष गेलें. त्यांनीं मॅटर्नजवळ जाऊन त्याला आपल्या होडींत घेतला आणि अनादिर चुकोट्कापासून पांच मैल दूर ते राहात होते तेथें त्याला घेऊन गेले. आराम व आहार यांनीं त्याला कांहींसें स्वास्थ्य लाभलें. तेव्हां चुकोटका वसाहतीपासून चौदा मैलांवर मच्छीमाऱ्यांची एक वसाहत होती तेथें त्याला नेण्यांत आलें. तेथें सोव्हियेत सरहद्दीवरील चौकीदार, ज्यांना तो नाहींसा झाल्याची बातमी कळविलेली होती व जे त्याच्या शोधांतच होते, ते त्याला भेटले. ते त्याला चुकोट्काच्या वसाहतींत घेऊन गेले. तेथें त्याची उत्तम प्रकारें शुश्रूषा झाली व तो बरा झाला.

बरा होतांच मॅटर्नला पहिला विचार आपल्या विमानाचा आला. विमान मोडून पडलें होतें तेथें जाण्यासाठीं एक लहान तुकडी तयार करण्यांत आली. मॅटर्नच्या सांगण्यावरून विमानांतून इंजिन व त्याचें नियंत्रण करणारीं यंत्रें काढून वसाहतींत नेण्यांत आलीं. बाकीचा भाग तेथेंच ठेवून देण्यांत आला. जुलैच्या ८ तारखेला ही तुकडी अनादिर चुकोट्का वसाहतींत परत आली. मॅटर्नच्या सुरक्षिततेच्या तारा त्याचा संबंध असलेल्या ठिकाणीं पूर्वींच करण्यांत आल्या होत्या.

मॅटर्नला सोव्हियेत विमानांतून उत्तर सायबेरियांतून नोम येथें पोंचविण्यांत आलें. मॅटर्नच्या विनंतीवरून त्याला घेऊन जाण्यासाठीं अमेरिकन विमान तेथें येऊन पोंचलें होतें.

जेम्स मॅटर्न विमानांतून पृथ्वी प्रदक्षिणा करावयास ३ जूनला न्यूयॉर्कहून निघाला होता, आणि सर्वत्र फिरत फिरत १२ जूनला खाबारोव्स्कला आला होता. वरील वर्णन त्यानंतर घडलेल्या हकीगतीचें आहे.

---

## महादेवभाई देसाई [ पान ३ वरून पुढें चालू ]

जीवनचरित्र लिहिण्याऐवजीं महादेव माझ्या नशिबींच आपलें जीवनचरित्र लिहावयाचें सोडून निघून गेले !"

महादेवभाईंच्या देहावसानानंतर कांहीं दिवसांनीं सुशीला बेहेननें एकदां बापूजींना विचारलें : "आजपर्यंत ज्यांच्या ज्यांच्या मृत्यूंचे आघात तुम्हांला सहन करावे लागले त्यांत महादेवभाईंच्या मरणाचा आपणांवर सर्वांत जास्त परिणाम नाहीं का घडला ?" बापूजी म्हणाले : "जमनालाल, मगनलाल आणि महादेव हे तिघे आपापल्याला क्षेत्रांत अनन्य होते. त्या तिघांपैकीं एकाचीहि जागा भरून निघणें कठिण. मला हें मात्र सांगितलें पाहिजे कीं या तिघांपैकीं महादेवनें माझ्यामध्यें संपूर्णपणें सामावून जाणें पसंत केलें होतें. मी असें म्हणूं शकेन कीं, माझ्याहून अलग असें स्वतःचें निराळें व्यक्तित्व ठेवणें त्यांनीं सोडून दिलें होतें." खरोखर महादेवभाई बापूमय होऊन गेले होते.

महादेवभाई म्हणजे महादेवभाईच. त्यांच्या उदात्त, त्यागपरायण, सेवाभावयुक्त स्नेहाळ आणि उमद्या जीवनानें 'महादेवभाई' हें नांव उच्च आदर्शांचें प्रतीक बनलें होतें. त्यांच्या जीवनांतील प्रसंगांचें स्मरण करतांना आपलें जीवन दिव्य आनंदानें निथळून निघतें, आणि त्यांच्या जीवनाचा सुवास सर्वत्र दरवळतो.

---



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. नगीनदास पारेख

# रवीन्द्रनाथांचें शिक्षण

[1]इ. स. १९२३ सालीं अहमदाबाद मुक्कामीं कविकुलगुरु रवीन्द्रनाथांना एकजणानें प्रश्न विचारला कीं, " विश्वविद्यालयांत न पाठवतांहि आपल्या वडिलांनीं आपणा सर्वांना असें ज्ञानशक्तिसंपन्न कसें केलें ? "

या प्रश्नाचें उत्तर देतांना रवीन्द्रनाथ म्हणाले :

" पितृदेवांनीं मेजदादा-( सत्येन्द्रनाथा )वांचून कोणालाहि बाहेर शिक्षणासाठीं पाठविलें नव्हतें. त्यांनीं आमचें घरच एक खरेंखुरें विद्यालय बनविलें होतें. जरी द्वारकानाथांचें ऐश्वर्य आमच्या परिवारांत आतां राहिलें नव्हतें, तरीहि वडिलांनीं सर्व सांसारिक खर्च शक्य तितके कमी करून ज्ञानी व गुणी जनांसाठीं आपलें द्वार सदां खुलें ठेवलें होतें. त्यांच्या सतत समागमामुळें आमच्या घरांतील वातावरण चिन्मय बनून गेलें होतें. त्यांच्या सत्काराप्रीत्यर्थ पितृदेव जसा सढळ हातानें खर्च करीत तसा अनेक राजामहाराजांनाहि करतां येत नव्हता. या वातावरणांतूनच आम्हांला शिक्षण मिळालें.

" त्या काळीं आमचा आहार व पोशाख खूप साधा होता. उन्हाळ्याच्या दिवसांत आम्हांला एक सुती पेहेरण घालायला मिळे. थंडीच्या दिवसांत त्यावर दुसरी एक पैरण घालीत असूं इतकेंच. या पैरणीलाहि खिसा नसे म्हणून मनाला वाईट वाटे. आम्हांला एक सपातजोड्यांची जोडी मिळत असे खरी. पण त्यांचा उपयोग केल्यासारखें वाटत नाहीं. मोज्यांशीं लहानपणीं कधीं माझी ओळखहि झाली नव्हती. दूध व चुरमुरे ही आमची न्याहारी. एखादी पुरी मिळाल्यावर मग काय विचारावें ! आजकालचीं मुलें ज्या वस्तूंना तुच्छ लेखतात त्याहि त्या वेळीं आम्हाला दुर्लभ होत्या. म्हणून ज्या वस्तू तेव्हां आम्हांला मिळत असत, त्यांचा पुरा आस्वाद आम्ही चाखीत असूं.

" आमचें घर सदां माणसांनीं गजबजलेलें असे. स्वजन—परजन, अतिथि-अभ्यागत सर्वांना आमच्या येथें स्थान मिळे. सर्वांना आम्ही ओळखीत असूं असेंहि नाहीं. अभ्यागत केवळ दाराशीं आल्याबरोबर त्याचें आतिथ्य होई व पुष्कळ तर बरेच दिवस तेथें राहातहि असत. त्यांच्यासाठीं पान-तंबाकू, दोन वेळ भोजन, न्याहारी, सर्व कांहीं नियमितपणें हजर होत असे. समाजांत आम्ही कांहींसे बहिष्कृतासारखेच होतों. त्यामुळें लोकाचार व सामाजिक बंधनें आम्हांला कमी असत. यायोगें आम्हांला खूप स्वतंत्रपणें वागतां येत असे.

" शहर असूनहि तेव्हां आमच्या घरीं पुकुर

---

१. आचार्य क्षितिमोहन सेन यांच्या " देश "मध्यें प्रसिद्ध झालेल्या लेखावरून श्री. नगीनदास पारेख यांनीं गुजराथी " युगदर्शन "च्या डिसें. १९४९ च्या अंकांत वरील मथळ्याचा लेख लिहिला, त्याचा हा सरळ अनुवाद आहे. श्री. नगीनदास पारेख हे गांधीजींच्या ' गुजरात विद्यापीठा 'चे स्नातक, बंगाली भाषेचे रसिक पंडित, गुजरातीमधील उत्तम लेखक व अनुवादकार असून सध्यां ' गुजरात विद्यासभे 'त गुजरातीचे प्राध्यापक आहेत.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

( लहान तळें ) असें. त्यांतच सर्व स्नान करीत. भरतीच्या वेळीं गंगेचें पाणी कालव्यांतून पुकुरांत येत असें. त्यांत मासे प्रवाहाच्या विरुद्ध दिशेला तरंगत येतांना दिसत असत. मीं असें ऐकलें आहे कीं, त्या वेळीं आमच्या अगदीं घरापर्यंत कालव्यांतून होड्या येत. त्या कालव्यावर जवळजवळ असे दोन लकडीपूल होते व त्यांवरूनच त्या जागेला 'जोडा साँको' असें नांव पडलें होतें.

"त्या काळीं अजून पाण्याचे नळ आले नव्हते. तळमजल्यावर एका अंधाऱ्या खोलींत मोठमोठ्या कोठ्यांमधून सबंध वर्षाचें पिण्याचें पाणी सांठवून ठेवीत असत. माहीशिमग्यामध्यें गंगेचें स्वच्छ पाणी भोईलोक कावडीनें आणून कोठ्या भरून ठेवीत असत. खोली अंधाराची होती. जणूं कोणा भुताचें घर तर नाहीं ना असें वाटे.

"त्या वेळींहि आमच्या घरीं धान्य ठेवायचें कोठार, पोह्यांची उखळी ठेवण्याचें घर, सर्व कांहीं होतें. चारी बाजूंना झाडेंझुडेंहि होतीं. दासदासींना त्यांत रात्रीं भुतेंखेतें व ब्रह्मराक्षस दिसत. मी उत्सुकतेनें त्या सर्व गोष्टी त्यांच्याजवळून ऐकत असें. 'ऐकत' असें म्हणणें बरोबर नाहीं. गोष्टी 'गिळून' टाकीत असें. अर्थातच त्या गोष्टी ऐकून अंधारांत अंगावर कांटा उभा राही. झाडेंझुडें असल्यामुळें वर्षा, शरद् वगैरे ऋतूंचा आम्हांला त्या वेळींहि परिचय होत असे. गांवठ्या गांवांतल्यासारखे घराचे हाल झाले तरी एका पिढीपूर्वीच्या ऐश्वर्याचे कांहीं अवशेष अजून कायम होते. जुन्या काळची नवाबी थाटाची पालखी देवडींत पडून होती. त्यांत बसून मी देशोदेशींचीं स्वप्नें पाहीं. रॉबिन्सन क्रूसो आपल्या फुटक्या जहाजाच्या फळीवर बसून समुद्रांत तरंगत तरंगत फिरला आणि मी सर्वांच्या नजरेआड या पालखींत बसून मनरूपी भोयाच्या खांद्यांवर चढून, सात समुद्र नि तेरा नद्या, तसेंच तेपांतरचें मैदान ओलांडून जाऊन, किती तरी चक्रवाकूचक्रवाकींच्या देशांतून, कित्येक राजवाड्यांतून, कित्येक दैत्यपुरांतून व देशोदेशीं भटकून येत असें. माझ्या कल्पनेचे भोई मला कित्येक वनांत व जंगलांत घेऊन गेले आहेत, किती तरी नद्या–पर्वतांच्या पलीकडे घेऊन गेले आहेत. कित्येक प्राण्यांच्या जबड्यांत मी सांपडलों आहें ! तें सगळें आज थोडेंच लक्षांत असणार ? आमच्या घरांत एका जागीं, असें म्हणतात कीं, राजवाडाहि होता. मीं तो कधीं नजरेनें पाहिला नाहीं. पण कल्पनेंत अनेक वेळां मी तेथून फिरून आलों आहे.

"त्या वेळीं अजून आमच्या देवडीवर दरवान् होता. त्याला कुस्ती खेळायला व लाठी फिरवायला एक आखाडा होता. गोरगरीब लोक आपल्याला मिळावयाच्या दानासाठीं देवडीवर बसून राहात. त्या काळांत आमच्या घरून कोणी विन्मुख परत जात नसे.

"मोठमोठे विद्वान् व पंडित येऊन पितृदेवांच्या दिवाणखान्यांत शास्त्रें व विद्या यांची चर्चा करीत. गवैय्ये–बजवैय्ये आपापल्या विद्या दाखवीत. या लोकांनींच आमचें घर म्हणजे एक जिवंत विश्वविद्यालय बनविलें होतें. या बाबतींत पितृदेवांनीं कधीं रेसभरहि कंजुषपणा केला नाहीं.

"गवैय्यांत श्रेष्ठ उस्ताद होते यदु भट्ट. त्यांची इच्छा मला शागीर्द बनवावा अशी होती. माझें मन शाळेंत रमत नव्हतें. या जाळ्यांतहि तें अडकलें नाहीं. पण एकलव्याप्रमाणें दुरूनच मीं त्यांचीं पुष्कळ गीतें पाठ करून टाकलीं होतीं. ( ब्राह्म ) समाजाचे गायक कृष्ण व विष्णु मोठे भक्त होते. त्यांच्या आगमनामुळें विजया वगैरेंच्या गीतांनीं घरच्या सर्वांचीं मनें प्रफुल्ल राहात असत.

"गायक विष्णु चक्रवर्तींचें मन बालकाप्रमाणें कोमल होतें. त्यामुळें त्यांना मुलांच्या मनांतील भावना समजत असत. उस्तादी तालाचे बोल न शिकवितां ते देशी लोकगीतांमार्फत आम्हांला छंद व ताल शिकवीत :

'एक जे छिल बेदेर मेये एल पाडाते
साधेर उलकी पराते.
आबार उलकी परा जेमने तेमन लागिये दिल
भेलकि, ठाकुरझि.
उतकिर ज्वालाते कत केंदेछि, ठाकुरझि'

[ 'एक बांसरीवाल्या गारुड्याची बायको होती. ती अंगावर गोंदण गोंदायला मोहल्यांत आली. गोंदण पण असें तसें नाहीं ! माझ्यावर तिनें तर जादूच केली, नणंदे. या गोंदण्याच्या भडक्यानें मी किती तरी रडलें, नणंदे !" ]




अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# रवीन्द्रनाथांचें शिक्षण

" खेडेगांवच्या ढोलवाल्याचे ताल ते आम्हांला अशा तन्हेनेंच शिकवीत :

' डॅडांग् डॅडांग डॅडांग डॅग
चिंग्डी माछेर दुटो ठॅग्,
चिंग्डी माछेर चिंग्डी माछेर चिंग्डी माछेर
दुटो ठॅग्, दुटो ठॅग्, दुटो ठॅग्.

आणखी हेंहि ऐकवीत :

भेटकि माछेर दुटि दुटि कांटा
भेटकि माछेर कांटा.'

पखवाजाचे बोल अशा तन्हेनें ऐकवीत :

' चिते नाई भक्ति मने नाई रंग
धिक् ताय धिक् ताय धिक् ताय बोले मृदंग.'

संस्कृतांतहि बोलत :

' धिक् तान् धिक् तान् धिगेतान्
कथयति सततं कीर्तनस्थो मृदंगः ॥ '

" हें सर्व एकूनच मी त्यांच्या हातीं गेलों होतों. प्रेमभक्तिरसाचे रसीले वृद्ध श्रीकंठसिंह सर्वांचे मित्र होते. ते कधीं कोणाचे गुरु होऊं इच्छीत नसत. सतार वाजवितांना तन्मय होऊन ते नाचूं लागत. वसंत व होळीसंबंधींचीं पुष्कळ गीतें मी त्यांच्याजवळ शिकलों. त्यांच्या आसपास गीतें व सूर घुमत असत.

" जरा मोठा होतांच मला ज्योतिदादांनीं हातीं घेतला. ते माझ्यापेक्षां बारा वर्षांनीं मोठे होते. असें असूनहि त्यांनीं कधीं मी लहान म्हणून माझी उपेक्षा केली नाहीं. पियानोपाशीं बसून ते सतत नवे नवे सूर रचीत असत, आणि मला त्यासाठीं शब्द पुरे पाडावे लागत. त्यांच्याकडून उत्तेजन मिळालें नसतें तर गीतें रचण्याची माझी शक्ति विकास पावली असती कीं नाहीं; कोण सांगूं शकेल ! माझ्या मनांतील जो प्रवाह खुला करून ते गेले आहेत तो मृत्यूपर्यंत माझा जीवनसोबती म्हणून राहील.

" त्या काळीं आमच्या घरीं नवीं नवीं नाटकें लिहिलीं जात व अनुवादित होत. वडिलांच्या शौकाखातर नाटकाच्या गायनवादनाची मजलस सदां चालू असे. स्त्रियांनाहि झरोक्याआडून त्याचा रस चाखतां येई. पण आम्ही त्या वेळीं लहान होतों, आम्हांला त्यांत प्रवेश नव्हता. दुरूनच त्याचा किंचित्सा सुगंध हुंगायला मिळे. आमच्या घरूनच चालू काळांतील स्त्रियांची साडी नेसण्याची सभ्य रीत प्रचलित झाली होती.

" साहित्य, संगीत, अभिनय, कला-विद्या— हीं सर्व शिकण्याची सामग्री आमच्या घरीं होती. आमच्या दिनचर्येचें वर्णन ऐकलेंत म्हणजे तुम्हांला कळून येईल कीं आमचे दिवस कसे जात होते.

" अंधार असतांनाच आम्हांला अंथरूण सोडून कुस्तीच्या आखाड्यांत जावें लागे. कोठारघराच्या जवळच मातीला तेल लावून तो आखाडा तयार केलेला होता. कुस्ती करून मातीच्या अंगानेंच जेमतेम एक पैरण चढवून शरीरविद्येचें शिक्षण घ्यायला निघून यावें लागे. सात वाजतां मास्तर नीलकमल बसू येत. त्यांच्या येण्याच्या वेळांत एक मिनिटहि मागेंपुढें होत नसे. त्यानंतर एखाद्या दिवशीं सीतानाथ दत्त विज्ञान शिकवीत. मागाहून पंडित हेरम्बनाथ तर्करत्नांचें मुग्धबोध ( बालबोध ) व्याकरण चाले.

" प्रहरभर दिवस होई, मग आम्ही अंग वगैरे धुऊन म्हाताऱ्या घोड्याच्या गाडींत बसून शाळेंत जात असूं. साडेचार वाजतां परत आल्यावर पुन्हां व्यायाम. सायंकाळ होतांच तेलाच्या दिव्याच्या प्रकाशांत अघोर मास्तरांजवळ इंग्रजी शिकावयाचें. सबंध दिवसाच्या मेहनतीच्या योगें वाचायला बसतांच झोंप येई. वरच्यावर डुलकी येई म्हणून सुटी मिळे व मग गोष्टी— ' हातांत तलवार घेऊन राजपुत्र तेपांतरच्या मैदानांतून जातो '— ऐकतां-ऐकतांच झोंपीं जात असूं.

" ही ' रूपकथा ' ( गोष्ट ) खरोखरच ' रूपकथा ' असते. म्हणजे शब्दांच्या रंगानें नानाविध ' अपरूप ' ( विस्मयकारक ) चित्रें रेखाटण्यांत येतात. मनापुढें एकामागून एक चित्र रेखाटलें जाऊन पुढें सरकतें. त्याची निर्मिति अपूर्व असते, त्याची गतिहि अपूर्व असते. हीं सर्व ' रूपें ' रचणाऱ्या स्त्रिया आज कोठें आहेत ? पाठ्यपुस्तकें व टिपण्या घोक घोक घोकल्यानें त्या आज सुकून नाहींशा होत आहेत. गोष्ट सांगायची झाली तर आज पुस्तकांत पाहून सांगतात ! यापेक्षां नीरस दुसरें काय असूं शकेल ? खरें पाहतां, या शिशु-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

कथांचे कारागीरच आमच्या वेळीं बालकांचीं मनें तयार करीत असत. तेच खरे गुरु होते. आमच्या घरीं या कलावंतांची कदर होत असे. थोड्याच दिवसांनीं मीं शाळेला रामराम ठोकला. या सर्व गुरूंनींच आम्हांला घडविलें.

" माझा एक दुसरा गुरु होता. तो म्हणजे आमच्या घराची गच्ची व आकाश. शाळा नव्हे. दुपारच्या वेळीं दुरूनच दूरदूरच्या फेरीवाल्यांच्या निरनिराळ्या आरोळ्या व भांडीवाल्यांचा ' टन् टन् ' आवाज ऐकूं येई. तीक्ष्ण स्वरानें आकाशाचा वेध घेणाऱ्या घारी उडत. गच्च्यांगच्च्यांवर स्त्रिया डाळीच्या वड्या वाळत घालीत, ' आमसत्वें ' ( आंब्रस ) सुकवीत. हें सर्व मला ऐकूं येई व मी पाही. आणखी पाहात असे चारी बाजूंचीं झाडें-झुडपें. बीजांतून अंकुर कसा फुटतो तें पाहण्याची माझी जी आतुरता असे तिला अंत नव्हता.

" शाळा सोडल्यावर पंडित ज्ञानचंद्र भट्टाचार्य मला कालिदास व शेक्स्पिअर यांचीं नाटकें बंगालींत सांगत असत, आणि मला तीं पद्यांत लिहावीं लागत. समजो न समजो. पण या संस्कृतांतील छंदांनीं माझें मन नाचायला लागे. ' कुमारसंभवां 'तील 'मंदाकिनीनिर्झरसीकराणां वोढा मुहुःकंपितदेवदारुः ।' इत्यादि श्लोक माझ्या मनाला नाचायला लावीत. ' गीत-गोविंदां ' तील—

' अहह कलयामि वलयादिमणिभूषणं
हरिविरहदहनवहनेन बहु दूषणम् । '

वगैरे छंदांमुळें माझें मन नाचूं लागे.

' मेघैर्मेदुरमम्बरं वनभुवः श्यामास्तमालद्रुमैः '

हें ऐकतां क्षणीं माझ्या मनाला मेघाची घन छाया घेरून टाकी.

" आमच्या घरीं बिहारी चक्रवर्ती वगैरे कवी रोज येत. त्यांची काव्यचर्चा चाले. पंडित साहित्य-रसाची रेलचेल उडवीत. आशु चौधुरी फ्रेंच काव्याची व अक्षय चौधुरी वगैरे इंग्रजी काव्याची मस्ती आणीत. विद्यासागर महाशय, राजेंद्रलाल मित्र वगैरेंची विद्याचर्चाहि चाले. मग आम्हांला विश्वविद्यालयाची काय जरूर असणार ? हे लोकच एकेक जण एकेक मूर्तिमान् विश्वविद्यालय होते !

" त्या काळीं आमचें घर स्वदेशीचा एक मोठा अड्डाच होतें. इंग्रजींत पत्र लिहिण्याचा रिवाज आमच्या येथें नव्हता. राममोहनरायांनंतर काँग्रेस स्थापन होण्यापूर्वीं हिंदु मेळा भरत असे. त्याच्याशीं आमच्या घराचा घनिष्ठ संबंध होता. इंग्रजांच्या साम्राज्यावादाविरुद्ध पुष्कळ लिहिलें जाई व बोललें जाई. लेखकांपैकीं मीहि एक होतों. अरविंद घोषांचे मातामह राजनारायण बसू आमचे पुढारी होते. ते आमच्या थोरल्या भावासारखेच होते. त्यांच्या वृद्ध देहामध्यें तरुण मन होतें. गुप्त संस्था, रक्तानें मंत्र लिहून दीक्षा वगैरे सर्व आम्ही करून बसलों होतों. काँग्रेसची जुनवाणी अर्ज-विनंत्यांची नीति आम्हाला कधींहि पसंत पडली नाहीं.

" राजनारायण बसूंचे जोडीदार आमचे दादा द्विजेन्द्रनाथ ठाकुर. ते एकाच वेळीं कवि व गणित-शास्त्रज्ञ, दार्शनिक व बालक होते. त्यांच्या ' स्वप्न-प्रयाण ' वगैरे काव्याचा ओघ सगळें घर भरून टाकी आणि त्यांच्या हास्यतरंगांमुळें सबंध घर दुमदुमून जाई. त्याबरोबरच दासीजनांत गोष्टी सांगणें चाले, नोकरवर्गांत आख्यानें, रामायण, बाउलगीतें व कीर्तनें चालत. स्त्री-वर्गांत गप्पागोष्टी व निरनिराळ्या कलांची कारागिरी ,पुरुषांत साहित्य, संगीत, अभिनय, चित्र वगैरे चालत. अभिनयासाठीं संस्कृतांतून नाटकांचे अनुवाद करण्यांत येत. बंगालींतहि नाटकें लिहिलीं जात. या सर्व साधनेच्या व आनंदाच्या केन्द्रस्थानीं पितृदेव आपले निःशब्द ध्यानासन करून बसलेले असत. त्यांच्या दिवाणखान्यांत गुणी जन येत, ज्ञानी येत, आणि भारताच्या अपूर्व मनीषेचा व अध्यात्मसंपत्तीचा परिचय करून घेत. स्वागत, अभ्यर्थना आणि पुरस्कार यांच्या द्वारें त्यांचा सत्कार करण्यांत येई.

" सतरा वर्षांच्या वयाला विलायतेला जाण्यापूर्वींच आमच्या घरचा विद्वज्जनसमागम मला पाहायला मिळाला होता. त्यांत खाणें-पिणें, गाणें-बजावणें, कवितापठण सर्व होतें. अशा एका समागमप्रसंगीं माझें ' वाल्मीकि-प्रतिभा ' नाटक करून दाखविलें होतें. मी झालों होतों वाल्मीकि व माझी पुतणी प्रतिभा बनली होती सरस्वती. त्यावरून नाटकाचें नांव ' वाल्मीकि प्रतिभा ' ठेवलें होतें..."









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. कृ. म. खाड्ये

# स्वतंत्र हिंदुस्थानची अर्थात् नवभारताची राष्ट्रभाषा

स्वतंत्र हिंदुस्थानची, अर्थात् नवभारताची राष्ट्र-भाषा कोणती असावी हा प्रश्न सध्यां फार महत्त्वाचा झाला आहे यांत तिळमात्र शंका नाहीं. हा प्रश्न आतां निकालांत निघाला आहे असें मानणें म्हणजे आपल्या डोळ्यांवर कातडें ओढून घेण्यासारखें आहे. इंग्रजांची मगरमिठी आमच्यावर असेतोंपर्यंत या प्रश्नाला वास्तविक तितकेंसें महत्त्व नव्हतें. कारण सामान्य जनतेला कांहींहि वाटत असलें तरी जोंवर इंग्रज हे आपले राज्यकर्ते होते तोंवर राज्यकार-भाराची भाषा इंग्रजी असणें अगदीं अपरिहार्य होतें. इंग्रज लोकांनीं आमची कोणतीहि भाषा आत्मसात् केली नव्हती. आमचे इंग्रज राज्यकर्ते हिंदुस्थानांत कधींहि स्थायिक झाले नव्हते. त्यांचा इंग्लंड-देशाशीं संबंध अव्याहत चालू होता. व्हॉईसरॉय किंवा गव्हर्नर हे इंग्लंडच्या बादशहाचे प्रतिनिधि म्हणूनच येथें वावरत होते. आय्. सी. एस्.ची व त्याप्रमाणेंच सर्व अखिल भारतीय सर्व्हिसची ' स्टील फ्रेम ' ही साहजिकच इंग्रजी भाषाभिज्ञांचीच होती. या नोकरी-मध्यें कांहीं हिंदी लोकांचा भरणा झालेला असला तरी त्यांची लायकी बऱ्याच प्रमाणांत त्यांच्या इंग्रजी भाषेच्या ज्ञानावरच उभारलेली होती. त्यामुळें राज्यकारभाराची भाषा ही इंग्रजीच राहिली.

## मुसलमान राज्यकर्ते हिंदी भाषा वापरीत

इंग्रज हिंदुस्थानांत येण्यापूर्वीं मराठ्यांनीं जरी हिंदुस्थानच्या बऱ्याचशा भागावर आपली सत्ता प्रस्थापित केली होती तरी महाराष्ट्राबाहेर त्यांची सत्ता केव्हांहि दृढमूल झालेली नव्हती आणि म्हणून मराठी ही अखिल हिंदुस्थानची राष्ट्रभाषा होणें हें अशक्य होतें. मराठ्यांच्या पूर्वीं आणि मराठ्यांच्या काळींहि मुसलमानांची सत्ता हिंदुस्थानच्या बऱ्या-चशा भागावर होती. तेव्हां या मुसलमानांची जी भाषा तीच राष्ट्रभाषा—म्हणजे मुख्यतः राज्य-कारभाराची भाषा—होणें हें ओघानेंच आलें. मुसल-मानांनीं आपल्या राज्यकारभाराची भाषा फारसी ( Persian ) ठेविली होती. हे मुसलमान पूर्वी जरी तुर्क होते तरी हिंदुस्थानांत ते इराणमधून आल्यानें त्यांची बोलण्याची भाषा साहजिकच फारसी झालेली होती व इराणशीं त्यांचा संबंधहि बराच काळ राहिला होता. इंग्लंडमध्यें जे नॉर्मन लोक आले ते मूळचे नॉर्समेन ( म्हणजे स्वीडन, नॉर्वे व डेन्मार्कचे ) होते. पण ते इंग्लंडमध्यें येण्यापूर्वीं नॉर्मंडीमध्यें ( फ्रान्समध्यें ) रहात होते; म्हणून त्यांनीं इंग्लंडमध्यें जी भाषा आणली ती फ्रेंच——नॉर्मन-फ्रेंच होती, ही गोष्ट या संबंधांत लक्षांत घेण्यासारखी आहे. आपले इंग्रज राज्यकर्ते आणि मुसलमान राज्यकर्ते यांच्यामध्यें एक मोठा फरक होता. तो हा कीं इंग्रज हे जसे इंग्लंडहून हें राज्य हांकीत होते तसें मुसलमान इराणमधून किंवा हिंदुस्थानच्या बाहेरून हें राज्य हांकीत नव्हते. ते येथें स्थायिक झाले. आणि म्हणून येथील भाषांशीं साधारण व्यवहारासाठीं तरी त्यांना संबंध ठेवावा लागला. साह-जिकच त्यांच्या राज्यकारभाराचें जें मुख्य केंद्र—म्हणजे दिल्ली—त्या शहराच्या आसमंतात् जी भाषा बोलली जात होती ती भाषा त्यांनीं साधारण व्यवहाराकरतां यला उचलली. राज्यकारभार मात्र फारसीमध्येंच ठेविला. त्यांतहि पहिल्यापहिल्यानें या भाषेची—म्हणजे फारसी भाषेची व्याप्ति दरबारी कारभार आणि मुसलमानी धार्मिक न्याय यांपुरतीच होती.



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अकबर बादशहाचा हिंदु महसूलमंत्री राजा तोडरमल यानें जमीनमहसुलासाठीं फारसी भाषा प्रथम उपयोगांत आणली. आणि जमीनमहसुलासारख्या सर्वगामी सामान्य व्यवहारांत फारसी भाषेचा प्रवेश झाल्यामुळें सामान्य व्यवहारांतहि फारसी शब्दांचा सुळसुळाट सुरू झाला व दिल्लीच्या आसमंतात् बोलल्या जाणाऱ्या देल्हवी (म्हणजे दिल्लीच्या) किंवा हिंद्री-हिंदवी (हिंदीचें पहिलें नांव हें होतें) भाषेवर फारसीचा पगडा बसला. राज्यकारभाराची भाषा जरी फारसी होती तरी सामान्य व्यवहारांत मुसलमान लोकहि या भाषेचा उपयोग करीत होते. किंबहुना, ही त्यांची बिनसरकारी दुसरी भाषा (Unofficial Second Language) बनत होती आणि मुसलमान लोकहि या काळांत हिंदूंच्या भाषांना परकीय मानीत नव्हते.

हिंदुस्थानवर स्वारी करणारे व नंतर राज्य करणारे मुसलमान आपल्या हिंदी प्रजेची भाषा वापरीत असत याला भरपूर पुरावा आहे. गझनीच्या महमुदाच्या नाण्यांवर खालील संस्कृत लिखाण आहे :

"अव्यक्तम् एकम् मुहम्मद अवतार; नृपति महमूद; अयं टंको महमूदपुरे घटे हतो : जिनयान-संवत्......"

बाबर बादशहाच्या स्वतःच्या कवनांतील पुढील भाग उल्लेखनीय आहे :

"मुझका न हुवा कुज हवस-ए-मानक-ओ-मोती."

अकबर बादशहाची खालील कवनें, भाषेच्या दृष्टीनें पाहाण्यासारखीं आहेत :

"जाको जस है जगतमें, जगत सराहै जाहि
ताको जनम सफल है, कहत अकब्बर साहि"

"पीथलसों (बिकानेरच्या पृथ्वीराजाबरोबर)
मजलीस गई, तानसेनसों राग
हंसिबो, रमिबो बोलिबो गयो बिरबल साथ.'-

खुद्द औरंगजेब बादशहानें आपल्या मुलाला लिहिलेल्या एका पत्रांत त्याला पाठविलेल्या दोन जातींच्या आंब्यांना नांवें कोणती द्यावीं या प्रश्नाला उत्तर म्हणून असें लिहिलें आहे कीं, एकाला 'सुधारस' म्हणावें व दुसऱ्याला 'रस्नाबिलास' (रसनाविलास) म्हणावें.

## 'हिंदुस्तानी' कशी रूढ झाली ?

मुसलमानांच्या पडत्या काळांत आणि हिंदुस्थानांत बाहेरून येणाऱ्या मुसलमानांचा प्रवाह स्थगित झाल्यावर हिंदुस्तानीचा प्रसार मोठ्या प्रमाणावर होऊं लागला. पण या भाषेला हिंदुस्तानी व उर्दू हीं नांवें देण्याचा व ही भाषा ग्रांथिक करण्याचा पहिला मान दक्षिणेंतील मुसलमानांकडे जातो. उत्तर हिंदुस्थानामध्यें हिंदी किंवा हिंदवी ही भाषा अगदीं अलीकडच्या काळापर्यंत वाङ्मयीन भाषा म्हणून प्रचारांत आलेली नव्हती. औधी (अवधी) आणि व्रजभाषा (व्रजभाखा) या भाषांमध्यें व क्वचित् कबीराच्या मिश्र हिंदवीमध्यें वाङ्मय तयार होत होतें. निकट संबंध असलेल्या, उत्तर हिंदुस्थानच्या निरनिराळ्या बोलींचा, पण मुख्यतः दिल्लीच्या आसमंतात् बोलल्या जाणाऱ्या हिंदवीचा दक्षिणेंतील मुसलमानांमध्यें बराच प्रसार झाला. दक्षिणेंतील हे मुसलमान, आपल्या उत्तरेकडील मुसलमान बांधवांचा संबंध रहावा म्हणून व विशेषतः येथील मराठे, तेलंगी आणि कानडी लोकांमध्यें आपण मिसळून जाऊं नये म्हणून, या भाषेचा जोरानें प्रसार करूं लागले. या दक्षिणेच्या मुसलमानांच्या भाषेंतहि या काळांत हिंदवी आणि संस्कृतोद्भव शब्दांचाच भरपूर भरणा होता. लिपि मात्र आरबी-फारशी झाली. उघडच आहे, त्यांची उत्तरेच्या राज्यकारभाराशीं आपला संबंध रहावा ही इच्छा होती आणि त्यांच्याहि राज्यकारभाराची भाषा फारसीच होती व तीच लिपि वापरणें त्यांना जास्त सोयीचें होतें.

१७ व्या शतकाच्या आरंभीं गोवळकोंडें येथील मुल्ला वझी व सुलतान मुहम्मद कूली कुतुबशाह या कवींनीं दक्षिणेंत या भाषेचा पाया दृढ रोविला. उत्तरेच्या मुसलमानांनीं या दक्षिणी मुसलमानांकडून धडा घेतला, आणि १७ व्या शतकाच्या अखेरीस हिंदुस्तानीचा जिकडेतिकडे जोरानें प्रसार होऊं लागला. सुरवातीला फारसी-आरबी लिपि सहजगत्या आली होती; पण पुढें पुढें मुसलमानांनीं या लिपीवर जास्त जोर देण्याचें कारण हें कीं त्यामुळें आरबी-



अनुक्रमणिका


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# स्वतंत्र हिंदुस्थानची अर्थात् नवभारताची राष्ट्रभाषा

फारसी शब्दांचा व आरबी-फारसी कल्पनांचा अंतर्भाव या भाषेमध्यें सुखानें होणें शक्य होऊं लागलें. उत्तर हिंदुस्थानांत या भाषेचें जें स्वरूप झालें तें साहजिकच दक्षिणी मुसलमान वापरीत असलेल्या भाषेहून थोडें निराळें झालें आणि ज्या वेळीं उत्तरेच्या मुसलमानांच्या, पुढें पुढें, दक्षिणी मुसलमानांवर व मराठ्यांवर स्वाऱ्या झाल्या त्या वेळीं या उत्तरेच्या मुसलमानांच्या भाषेंतील हा फरक स्पष्टपणें दिसूं लागला. आपल्या भाषेहून थोडी निराळी जी ही भाषा तिला त्यांनीं 'हिंदोस्तानी' हें नांव दिलें. त्या वेळीं हिंदुस्तान हा शब्द उत्तर हिंदुस्थानलाच लावण्याचा प्रघात होता. आताहि थोड्याबहुत प्रमाणांत हीच प्रथा चालू आहे. उत्तरेकडून आलेल्या भय्यांना आपणहि हिंदुस्थानचे भय्ये म्हणतोंच कीं नाहीं ? दक्षिणेची उत्तरेशीं फारिखत करण्यांत दक्षिणेला दख्खन व उत्तरेला हिंदुस्थान असें म्हणण्याचा प्रघात फार जुना आहे. संकुचित अर्थानें हिंदुस्थान म्हणजे उत्तर प्रदेशाचा पश्चिमभाग आणि पंजाबचा पूर्वभाग. बंगाली लोकहि याच भागाला हिंदुस्थान म्हणतात. तेव्हां दक्षिणेच्या मुसलमानांच्या दृष्टीनें ही दिल्लीकडे बोलली जाणारी भाषा हिंदोस्तानी झाली. झबान-ए-उर्दू हें नांवहि दक्षिणेंतील मुसलमानांनींच प्रचलित केलें. १७ व्या शतकाच्या शेवटीं शेवटीं मोंगल बादशहाच्या दक्षिणेंतील मुसलमान राज्यांवर व मराठ्यांवर ज्या स्वाऱ्या होत होत्या त्या वेळीं मोंगल बादशहा स्वतः जो तळ ठोकीत असे व ज्या तंबूंत रहात असे, त्या वसतिस्थानाची जी भाषा ती उर्दू. एका अर्थानें तिला राजभाषा म्हणतां येत होतें. अकबराच्या किंवा जहांगिराच्या काळीं हिंदुस्तानी ही राजभाषा होणें शक्यच नव्हतें. फारसी भाषेपेक्षां निराळी कोणतीच भाषा त्या वेळीं राजभाषा या पदवीप्रत जाणें अशक्य होतें. तसेंच दक्षिणेच्या मुसलमानांनीं औरंगजेब बादशहाच्या छावणीच्या भाषेला उर्दू म्हणणें हेंहि साहजिकच होतें. राजाच्या रहाण्याचें शहर अथवा त्याच्या वसतीची जागा या अर्थानें उर्दू या शब्दाचा अकबर बादशहाच्या कांहीं नाण्यावर उल्लेख आहे. पण या शब्दाचा उर्दू भाषा या अर्थानें प्रयोग १७ व्या शतकाच्या शेवटीं शेवटींच आणि दक्षिणेंतच प्रथम झालेला आहे. या शब्दाचें मूळ 'उर्दु' (ऱ्हस्व 'दु') या तुर्की शब्दांत आहे. या तुर्की शब्दाचा अर्थ तंबू, छावणी, किंवा राजाच्या वसतीचें स्थान असा आहे. पुढें जेव्हां हिंदु लोक नागरी हिंदीला देवभाषा म्हणून संबोधूं लागले तेव्हां मुसलमान लोक तिला 'नबीजीका भाषा ( Prophet's Speech )' म्हणूं लागले.

'हिंदुस्थानी' हें नांव हिंदुस्तानी या फारसी शब्दाचें संस्कृतीकरण आहे. या नांवाखालीं हिंदी आणि उर्दू या दोन भाषांचा समावेश करण्याचा कांहीं लोकांचा प्रयत्न आहे किंवा होता. पण तो प्रयत्न बहुतांशीं निष्फळ झाला आहे. इंग्रजांची मगरमिठी आमच्यावर असतांना हिंदु-मुसलमानांना एकत्र आणण्याचे जे अनेक प्रयत्न झाले त्यांपैकींच हा एक प्रयत्न होता. राजकीय तडजोडीसाठीं जे अनेक Formulas (अडाखे) तयार होत होते, व ज्या Formula या शब्दाचा स्वच्छ अर्थ 'तडजोडीसाठीं संदिग्ध शब्दांनीं भरगच्च भरलेला करार' असा करावा असें मला वाटतें, त्याप्रकारचा हा एक Formula होता : मुसलमानांनीं पाहिजे तर या भाषेला हिंदुस्तानीच म्हणत रहावें; हिंदूंनीं वाटल्यास तिला हिंदुस्थानी म्हणावें; आरबी व नागरी या दोन्ही लिप्या प्रचलित असाव्या; हिंदूंनीं फारसी लिपि शिकावी; मुसलमानांनीं नागरी लिपि शिकावी; संस्कृत आणि आरबी शब्द सारखेच असावेत वगैरे वगैरे. प्रत्यक्षांत या भाषेचा प्रचार अत्यल्प प्रमाणांत झाला. पण कांहीं तरी योग्य तडजोड झाली आहे असा भास मात्र उत्पन्न झाला. ही भाषा समजणें कोणालाच शक्य झालें नाहीं. दोन्ही लिप्यांचा एकसमयावच्छेदेंकरून प्रसार होणें हें अशक्यच होतें. शब्दांच्या निवडीवर एकमत होणें त्याहूनहि दुर्घट. तेव्हां ही भाषा ( tour de force ) 'कृत्रिम टूम' म्हणूनच कांहीं काळ अस्तित्वांत होती एवढेंच फार तर म्हणतां येईल. निष्कर्ष हा कीं हिंदुस्तानी हेंच या भाषेचें खरें नांव व दिल्लीच्या आसमंतांत किंवा थोड्या व्यापक दृष्टीनें या प्रश्नाकडे पाहिल्यास उत्तर प्रदेशाच्या पश्चिमभागांत व पंजाबच्या पूर्व-भागांत बोलल्या जाणाऱ्या भाषेवर दक्षिणेंतील व उत्तरेंतील मुसलमानांनीं आरबी-फारसी भाषेचें संस्कार करून बनवलेली जी







अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भाषा ती ही हिंदुस्तानी किंवा उर्दू किंवा नबीजीका भाषा. प्रथम प्रथम या भाषेला हिंदु लोक यावनी भाषा या नांवानेंच संबोधीत असत.

## ' खडी बोली ' आणि लष्करी हिंदुस्थानी

उत्तरेकडील हिंदूंचें या भाषेकडे १८ व्या शतकाच्या अखेरीअखेरीस लक्ष गेलें. त्या वेळीं दरबारी भाषा या पदवीप्रत ही भाषा पोंचली होती. राजभाषा म्हणूनच या भाषेची छाप त्यांच्यावर पडली. यापूर्वी हिंदूंचें वाङ्मय व्रजभाषा, औधी, बुंदेली वगैरे भाषांमध्यें व क्वचित् कबीराच्या मिश्र हिंदवी भाषेंत होत होतें. व याच भाषा हिंदुसमाजांत शिष्ट म्हणून गणल्या जात होत्या. यापुढें मात्र हिंदूहि याच भाषेला ' खडी बोली ' ( Standing Speech ) म्हणून मानूं लागले. हिंदुस्थानींतील पहिला गद्य ग्रंथ मुनशी सदासुख यांचा ' सुखसागर ' ( भागवत पुराणाचें गद्य भाषांतर ). हा ग्रंथ नागरी लिपींत लिहिलेला आहे. यानंतर मीर अम्मन यांचा ' बाघ-ओ-बहार ' ( १८०४ ) व हाफिझुद्दीन अहमद यांचा ' खीराद अफ्रोज ' ( १८०३-१८१५ ) हे आरबी लिपींत लिहिलेले गद्यग्रंथ, व लल्लूजी लाल यांचा ' प्रेमसागर ' ( १८०३ ) व सदल मिश्र यांचें नासिकेतोपाख्यान ( १८०३ ) हे नागरींत लिहिलेले गद्यग्रंथ जन्मास आले. यापूर्वी गद्य उर्दूतहि नव्हतें आणि हिंदींतहि नव्हतें. उर्दू काव्याचा उगम यापूर्वीचा आहे. नागरी भाषेंत लिहिलेल्या हिंदुस्तानी काव्याला १९ व्या शतकाच्या मध्यापासून सुरुवात झाली. १८ व्या शतकापूर्वी मुद्दाम म्हणून आरबी-फारसी शब्दांचा या भाषेंत भरणा होत नव्हता. १८ व्या व विशेषतः १९ व्या शतकांत मात्र दिल्ली, लखनौ आणि दक्षिण हैद्राबाद येथील लेखकांनीं या भाषेंत आरबी-फारसी शब्दांचा अतोनात भरणा करून या भाषेचें मूळचें स्वरूप पार बदलून टाकिलें.

हिंदुस्थानांतून इंग्रजांचें राज्य गेल्याबरोबर त्यांची राजभाषा जी इंग्रजी तिची जर उचलबांगडी करायची तर येथें मुसलमानांचें राज्य बरखास्त झाल्याबरोबर त्यांच्या पडत्या काळांत ज्या हिंदुस्तानीनें त्यांची दुय्यम राजभाषा या पदवीपर्यंत मजल मारिली होती त्या हिंदुस्तानीचाहि लय व्हावयास पाहिजे होता. पण इंग्रजीप्रमाणें हिंदुस्तानी ही एकदम परकीय भाषा केव्हांच नव्हती. ती हिंदुस्थानच्या एका विशिष्ट भागाची प्रादेशिक भाषा होती व आहे. तशीच हिंदुस्थानच्या सर्व मुसलमानांची एका प्रकारें ती धर्मभाषा होती. याहूनहि विशेष गोष्ट ही कीं, ज्याप्रमाणें सर्वच इंग्रज आज हिंदुस्थान सोडून जात आहेत त्याप्रमाणें सर्वच मुसलमान हिंदुस्थान सोडून गेले नाहींत व जात नाहींत. पाकिस्तानची स्थापना झाल्यावर या प्रश्नाला थोडेंसें निराळें स्वरूप आलें आहे ही गोष्ट खरी आहे. पण त्याबरोबर हेंहि खरें आहे कीं आजहि हिंदुस्थानांतील मुसलमानांची संख्या उपेक्षणीय आहे असें म्हणतां येणार नाहीं. शिवाय मुसलमानांचें राज्य गेल्यावर त्यांची जी पहिली राजभाषा फारसी—तिचा अस्त झालाच आहे. त्यांची हिंदुस्तानी ही दुय्यम राजभाषा होती. त्या भाषेचा बराच प्रसार झाला असल्याकारणानें इंग्रजांनींही त्या भाषेला आपली दुसरी राजभाषा बनविली होती. विशेषतः लष्करांत याच भाषेचा त्यांनीं प्रसार केला. इतकें खरें कीं ही लष्करी हिंदुस्तानी ' खडी बोली '-हिंदुस्तानीइतकी कठिण नव्हती व तिची लिपि आरबी-फारसी नसून रोमन होती. इंग्रज लोकांना असें वाटत होतें कीं हिंदुस्थानचा वारसा त्यांनीं दिल्लीच्या मोंगल बादशहाकडून घेतला, तेव्हां त्यांच्या दुय्यम राजभाषेला तरी आपण कांहीं तरी मान दिला पाहिजे. कोणत्याहि कारणानें का होईना इंग्रजांनींहि आपली राजधानी शेवटीं दिल्लीलाच नेली. तेव्हां दिल्लीच्या आसमंतांतल्या या भाषेला महत्त्व देणें त्यांनाहि सोपें गेलें. लिपीचीच त्यांना खरी अडचण भासली आणि रोमन लिपि स्वीकारून झटक्यासरशीं त्यांनीं ही अडचण दूर केली. नागरी लिपीला मुसलमान जो विरोध करतात तो विरोध त्यांनीं रोमन लिपीला कधींहि केला नाहीं. इंग्रज लोकांनीं हिंदुस्तानीचा असा बोज राखल्यामुळें हिंदुस्तानीच्या प्रसाराला आणखी मदत झाली, आणि हिंदुस्तानीला राष्ट्रभाषा बनविण्याचा मुसलमानांना साहजिकच मोह उत्पन्न झाला. हिंदुस्तानीला उचलून धरल्यानें हिंदूंवर वर्चस्व मिळण्याचा संभव हाहि त्यांचा एक डाव होता. महात्माजींच्या तडजोडीचा भरपूर फायदा घेण्याचें त्यांनीं ठरविलें.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

कारण, व्यावहारिक रीत्या महात्माजींची नवीन हिंदुस्थानी ही मुसलमानांच्या हिंदुस्तानीहून फारशी भिन्न नव्हती. पण आतां पाकिस्तान-स्थापनेमुळें व इंग्रजांच्या निर्गमनामुळें या प्रश्नाचा तात्त्विक विचार करणें बरेंच सुलभ झालें आहे.

### राष्ट्रभाषा व्यवहारोपयोगी व संस्कृतिपोषक पाहिजे

सध्यांहि स्वतंत्र हिंदुस्थानच्या लोकसत्तात्मक राज्याच्या मध्यवर्ती सरकारचें मुख्य केंद्र दिल्लीच आहे. तेव्हां कोणतीहि राष्ट्रभाषा झाली तरी तिच्यावर दिल्लीच्या आसमंतांतील भाषेचें किंवा भाषांचें वर्चस्व राहण्याचा संभव आहे हें विसरून चालणार नाहीं. त्यांत आजची दिल्लीची भाषा जी हिंदुस्तानी तीच राष्ट्रभाषा बनविल्यास त्या भाषेची इतर प्रांतांत प्रचलित असलेल्या भाषांशीं चांगलीच फारिखत होईल. आणि तिचे परिणाम अखिल हिंदुस्तानच्या संस्कृतीवर होतील. इंग्रजी किंवा फारसी या सर्वथैव परकीय भाषा असल्यामुळें त्यांचे कोणतेहि वाईट परिणाम इतर प्रादेशिक-भाषांवर झाले नाहींत. जे कांहीं परिणाम झाले ते चांगलेच झाले. त्यांना कांहीं नवीन योग्य शब्द मिळाले. या शब्दांनीं त्यांच्या मूळच्या शब्दांचें उच्चाटन केलें नाहीं. नवीन शब्दांनीं नवीन अर्थछटा दाखवितां आल्या. शिवाय या दोन्ही भाषा हिंदुस्तानीपेक्षां जास्त संस्कृतिपोषक होत्या. त्यामुळें त्या भाषांनीं घडवून आणलेलें संस्करण थोडयाबहुत प्रमाणांत उपकारकच ठरलें.

ज्या भाषेची छाप आमच्या प्रादेशिक भाषांवर पडली तर त्यांना तीं उपकारक होईल, ती भाषा त्या प्रादेशिक भाषांपेक्षां निश्चित जास्त सुसंस्कृत असली पाहिजे. हिंदुस्तानी ही बंगाली, मराठी, गुजराती, कन्नड, तेलगु, तामील किंवा मल्याळी या भाषांपेक्षां निश्चित जास्त सुसंस्कृत आहे असें कोण म्हणेल ? अखिल-भारताच्या राज्यकारभाराला उपयोगी पडणारी व सर्वसामान्य व्यवहारोपयोगी अशी राष्ट्रभाषा आम्हाला पाहिजे आहे यांत शंका नाहीं. पण हिंदुस्थानी व्यवहारोपयोगीहि ( Verkehrssprache ) नाहीं किंवा संस्कृतिपोषकहि ( Kultursprache ) नाहीं हें कोणीहि समतोल बुद्धीनें विचार करणारा मनुष्य कबूल करील. उत्तर-हिंदुस्थानच्याच लोकांच्या दृष्टीनें पाहिल्यास तिला कदाचित् Kultursprache-संस्कृतिपोषक म्हणतां येईल. पण इतर प्रादेशिक भाषांशीं तुलना करतां तिला या पदवीप्रत नेण्यास कोणीच तयार होणार नाहीं. तसेंच उत्तर-हिंदुस्थानच्याच लोकांच्या दृष्टीनें पाहिल्यास तिला ( Verkehrssprache ) व्यवहारोपयोगी मानण्यास कांहीं लोक तयार होतील पण आजचें लोकसत्ताक हिंदी राज्य हें उत्तर-हिंदुस्थानापुरतेंच मर्यादित आहे असें कोणी म्हणावयास धजावेल असें वाटत नाहीं. जी भाषा थोड्याबहुत प्रमाणांत सर्व हिंदुस्थानभर पसरलेली आहे ती उर्दू हिंदुस्तानी नव्हे व नागरी हिंदुस्थानीहि नव्हे. एकमुखी राज्यकारभारा-( Unitary Government ) चें अवास्तव स्तोम माजविणारे लोक हें विसरतात कीं, खरी एकात्मता ही विविधतेंतील एकात्मता होय. खरी संस्कृति ही अनेक संस्कृतींची गुंफण असते. निरनिराळ्या प्रादेशिक संस्कृती एक करून जी संस्कृति बनविली जाईल तीच खरी संस्कृति होऊं शकेल. उत्तर-हिंदुस्थानाबाहेरील बहुजनसमाजास जी भाषा सुतराम् समजत नाहीं ती भाषा राष्ट्रभाषा करून उत्तर हिंदुस्थानचें हिंदुस्थानच्या इतर भागांवर वर्चस्व गाजविण्याचा प्रयत्न करणें म्हणजे हिंदुस्थानमध्यें नवीन एका भांडणाचा पाया म्हणून ठेवण्यासारखें आहे.

यावर जी एक नवीन तोड काढण्यांत आली आहे ती ही कीं ' या हिंदुस्थानीला आपण हिंदुस्तानी किंवा हिंदुस्थानी असें न म्हणतां हिंदी किंवा नागरी हिंदी म्हणूं. तिची लिपि आग्रहानें देवनागरीच ठरवूं. देवनागरी ही लिपि ठरविल्यामुळें साहजिकच संस्कृत शब्दांचा भरणा तिच्यामध्यें अधिक प्रमाणांत होईल. रूढ झालेल्याहि फारसी शब्दांचें उच्चाटन करूं. आग्रहानें संस्कृत वा तत्सम शब्दांचा भरणा करूं म्हणजे ती खात्रीनें Kultursprache ( संस्कृतिपोषक ) होईल.' हिंदुस्थानच्या सर्व हिंदूंना तरी संस्कृत येतेंच येतें असा या लोकांना भ्रम आहे, आणि म्हणून त्यांना असें वाटतें कीं हिंदुस्थानच्या सर्व हिंदूंना तरी ही भाषा समजण्यास अडचण पडणार नाहीं;








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आतां तर पाकिस्तानच्या जन्मानंतर मुसलमानांचा आपणांस मुळींच विचार करावयास नको. संस्कृत-वर आधारलेली आणि संस्कृतनें पुष्ट केलेली ही भाषा संस्कृतिसंपन्न किंवा संस्कृतिपोषक नाहीं असें कोण म्हणेल? पण यांच्या हें लक्षांत येत नाहीं कीं, या भाषेंत संस्कृतिपोषक जीवनसत्त्वें आहेत किंवा येऊं शकतील असें म्हणणें आणि संस्कृतमध्यें संस्कृतिपोषक जीवनसत्त्वें आहेत असें म्हणणें यांत तादृश कोणताच फरक नाहीं. हीच विचारसरणी पुढें नेल्यास आपली Kultursprache संस्कृतच बनवावी असें म्हणण्यास कोणताच प्रत्यवाय येणार नाहीं. आणि कांहीं लोकांचें हेंच मत आहे ही गोष्ट आतां सर्वांना समजलेली आहे. संस्कृतमध्यें संस्कृति-पोषक जीवनसत्त्वें भरपूर आहेत याबद्दल वाद नाहीं. पण या जीवनसत्त्वांसाठीं संस्कृताकडेच जाण्याऐवजीं या आडमार्गानें जाण्याचें कांहींच कारण नाहीं. सर्व प्रादेशिक भाषा या जीवनसत्त्वांचा भरपूर उपयोग करीत आहेत. शिवाय हेंहि लक्षांत घ्यावयास पाहिजे कीं, संस्कृतशिवाय दुसऱ्या प्रगल्भ भाषांमध्यें आधुनिक जगताला मानवतील अशीं आणि जीं संस्कृत-मध्यें नाहींत अशीं पुष्कळच जीवनसत्त्वें आज उपलब्ध आहेत. त्यांचाहि समावेश आपल्या नवीन Kultursprache मध्यें झाला पाहिजे.

## नागरी हिंदीचें स्वरूप

Kultursprache म्हणून या नागरी हिंदीला कांहीं महत्त्व आहे असें आपण तात्पुरतें धरून चालूं; पण ही नागरी हिंदी Verkehrssprache (सामान्य व्यवहारोपयोगी) आहे असें म्हणणाऱ्यांच्या धाडसाचें आश्चर्य वाटतें. हिंदुस्थानच्या कितीशा लोकांना संस्कृत येतें व किती लोकांना तें शिकणें सुलभ आहे? शाळा-कॉलेजांमध्यें संस्कृत कठिण जातें म्हणून दुसरी भाषा घेणारे किती विद्यार्थी आहेत याची या लोकांनीं कधीं चौकशी केली आहे काय? बहुजनसमाजाला संस्कृत येतें किंवा सुलभतेनें येऊं शकेल असें प्रामाणिकपणानें मानणारे किती लोक असतील ते असोत!

या भाषेच्या (नागरी हिंदीच्या) आणि हिंदुस्तानी (उर्दू) भाषेच्या व्याकरणांत काडीइतकाहि फरक नाहीं. लिंगवचनांचा गोंधळ हिंदुस्तानीइतकाच आहे. प्रत्ययांची व शब्दविकारांची रेलचेल आहे. हिंदुस्तानी आणि ही भाषा यांतील मुख्य फरक म्हणजे हिंदुस्तानी फारसी लिपींत लिहितात, तर ही भाषा देवनागरींत लिहिली जाते. फारसी लिपि समजणाऱ्या लोकांपेक्षां देवनागरी लिपि जास्त लोकांना समजते ही गोष्ट या भाषेच्या बाजूनें बोलण्यासारखी आहे. पण मुसलमानांनीं फारसी लिपि स्वीकारण्याला जर फारसी-आरबी शब्द सुलभतेनें घेतां येतात हें कारण होतें तर हिंदूंनीं नागरी लिपि संस्कृत शब्दांचा सुलभतेनें भरणा करतां येतो म्हणूनच स्वीकारली असें म्हणणें फारसें वावगें होणार नाहीं. या भाषेंतील शब्दांचा मुख्य भरणा संस्कृत वा तत्सम शब्दांचा आहे. तद्भव शब्दांवर या भाषेची भूक भागत नाहीं. या भाषेंत फारसी-आरबी शब्द नाहींतच असें नाहीं; पण हे शब्द शक्य तितके कमी करण्याकडे या भाषेची प्रवृत्ति आहे हें नाकबूल करतां येणार नाहीं. यापुढें जाऊन असेंहि म्हणतां येईल कीं, या भाषेचे प्रवर्तक अगदीं रूढ झालेल्या शब्दांनाहि फक्त ते मूळचे फारसी आहेत म्हणून फांटा देण्यास एका पायावर तयार आहेत. उदाहरणार्थ, 'आदमी' हा शब्द त्यांना आवडत नाहीं. त्याबद्दल ते 'नर' अथवा 'पुरुष' हा शब्द वापरतील. हे दोन्ही प्रकारचे शब्द भाषेमध्यें असल्यास कालांतरानें त्यांच्या निरनिराळ्या अर्थच्छटा होऊन भाषा जास्त समृद्ध होईल याकडे ते दुर्लक्ष करतात. 'औरत'च्या ऐवजीं 'नारी', 'बच्चा'च्या ऐवजीं 'शिशु', 'हवा'च्या ऐवजीं 'वायु', 'कम'च्या बद्दल 'अल्प', 'मालुम'च्या ऐवजीं 'ज्ञात', 'नजिक'च्या ऐवजीं 'निकट', 'देर'च्या ऐवजीं 'विलंब'—असे किती तरी प्रतिशब्द या भाषेचे प्रवर्तक या भाषेंत रूढ करूं पाहत आहेत. नागरी हिंदी ही निःशंकपणें हिंदुस्तानी किंवा उर्दू भाषेवर प्रत्याघात म्हणून अस्तित्वांत आली आहे. 'मीठा' या शब्दाबद्दल मुसलमान लोक 'शिरीन' हा शब्द वापरतात म्हणून हे नागरी हिंदीचे प्रवर्तक मिष्ट किंवा सुमिष्ट हा शब्द वापरतील. 'लाजवंती' या शब्दाबद्दल मुसलमान लोक 'शरमिंदा' हा शब्द वापरतात म्हणून हे लोक 'लज्जाशीला' वापरतील.









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# स्वतंत्र हिंदुस्थानची अर्थात् नवभारताची राष्ट्रभाषा

नागरी हिंदीची परंपरा फार जुनी नाहीं. नागरी हिंदीमध्यें गद्य लिहिण्यास सुरुवात १९ व्या शतकाच्या प्रारंभास उर्दूबरोबरच झाली. तिच्यांत काव्य लिहिण्यास सुरुवात त्यानंतर पन्नास वर्षांनीं झाली ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. जगांतील बहुतेक सर्व संपन्न भाषांमध्यें हा क्रम उलटा असतो. आधीं काव्य मग गद्य. उर्दू काव्याची परंपरा याहून जुनी आहे. तुळशीदासांचें रामायण हें हिंदीमध्यें लिहिलेलें नाहीं. तें जुन्या औधींत लिहिलेलें आहे. सूरदासाचा 'सूरसागर' व्रजभाषेंत लिहिला आहे. कबीराच्या कवनाची भाषा शुद्ध हिंदी नाहीं. ती व्रजभाषा व हिंदवी या भाषांचें मिश्रण आहे. पृथ्वीराज चव्हाणाचे दोन पुतणे आल्हा आणि ऊदल यांच्या बावन्न लढायांवर लिहिलेलीं कवनें बुंदेलींत आहेत. तेव्हां हें सगळें वाङ्मय हिंदीमध्यें आहे हें म्हणणें सत्यास धरून नाहीं. नागरी-प्रचारिणी-सभा स्थापन झाल्यास आज उणींपुरीं पन्नास वर्षेंच झालीं आहेत. आणि त्या सभेनें या नागरी हिंदीला जोराची चालना दिली आहे. तिच्या या प्रयत्नाविरुद्ध आम्हांला कांहींहि बोलावयाचें नाहीं. पण तिचा हा प्रयत्न म्हणजे प्रतिकारात्मक असा एक झगडा आहे. उत्तर प्रदेशामध्यें व पूर्व पंजाबमध्यें हा झगडा त्यांनीं खेळावा पण त्याची झळ हिंदुस्थानच्या इतर भागांना लागूं नये एवढीच आमची इच्छा. आणि मुख्यतः फक्त मुसलमानांची भाषा म्हणून जर उर्दू भाषा राष्ट्रभाषा होण्याला नालायक आहे तर नागरी हिंदी फक्त संस्कृत पंडितांची भाषा म्हणून राष्ट्रभाषा या पदवीला पोंचण्यास योग्य नाहीं हाच निष्कर्ष काढणें आम्हांस भाग आहे.

## नवीन भाषा बनविणें सुकर

उर्दू, हिंदुस्तानी आणि नागरी हिंदी हा दोहोंपैकीं कोणतीहि भाषा जर राष्ट्रभाषा होण्यास योग्य नाहीं, तर राष्ट्रभाषेचा प्रश्न सुटणार तरी कसा? हिंदुस्थानच्या इतर प्रादेशिक भाषांपैकीं कित्येक Kultursprache होण्यास लायक आहेत यांत कोणालाहि शंका येण्याचें कारण नाहीं. पण यांपैकीं कोणतीच भाषा Verkerssprache होण्याला योग्य नाहीं हें कबूल करावें लागेल. आपल्या राष्ट्रभाषेला अगदीं आवश्यक अशा कोणत्या गोष्टी पाहिजेत याचा प्रथम विचार करावा लागेल.

स्वतंत्र हिंदुस्थान हें लोकसत्तात्मक राज्य आहे हें विसरून चालणार नाहीं. त्याप्रमाणेंच हें कोणत्याहि एका धर्मावर अधिष्ठित झालेलें राज्य नाहीं हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे. हिंदुस्थान हा एक अफाट देश आहे आणि प्रगल्भावस्थेंत पोंचलेल्या निदान नऊ-दहा भाषा तरी या देशांत आज प्रचलित आहेत ही गोष्ट सतत नजरेपुढें ठेविली पाहिजे. यांपैकीं कोणतीहि एक प्रगल्भ भाषा, कोणत्याहि एका धर्मावर अधिष्ठित असलेली भाषा किंवा बहुजनसमाजास न पेलणारी कोणतीहि भाषा राष्ट्रभाषा म्हणून निवडणें चुकीचें होईल. शिवाय ज्याप्रमाणें बहुजनसमाजास पेलणारी ही भाषा पाहिजे, त्याचप्रमाणें ती राज्यकारभारास उपयोगी पडणारीहि पाहिजे. इंग्रज लोक राज्य करीत असतांना बहुजनसमाजास पेलणें हीच एक भाषेची कसोटी होती. आज ती राज्यकारभारास उपयोगी पडण्यासारखी पाहिजे ही दुसरी कसोटीहि तिला लावणें जरूर आहे. इंग्रजांचें राज्य असेपर्यंत राज्यकारभाराची भाषा इंग्रजीच रहावयाची याबद्दल कोणालाच शंका नव्हती. इंग्रजांचें राज्य गेल्यानंतर नेहमींच इंग्रजीचीच भाषा राज्यकारभाराची भाषा व व्यवहारोपयोगी दुसरी भाषा ही स्थिति एका कांहीं तरी विशिष्ट मर्यादेपुढें चालूं देणें आम्हांस नामुष्कीचें आहे. आजच राज्यकारभाराची भाषा बदलली पाहिजे असें म्हणण्याचें कारण नाहीं व असें कुणी म्हणूंहि नये. पण कालांतरानें ती बदलतां येईल अशी व्यवस्था मात्र आजपासूनच झाली पाहिजे.

ही भाषा उपजतांच संस्कृतिसंपन्न असली पाहिजे असें धरून चालण्याची मुळींच जरूरी नाहीं. कालांतरानें ती तशी होण्यासारखी असली म्हणजे आपणांस तक्रार करण्यास जागा उरणार नाहीं. तात्त्विकदृष्ट्या या स्थितींतून खरा मार्ग काढावयाचा तर तो एका नवीनच भाषेची उभारणी करणें हा होय. नवीनच भाषा बनविली म्हणजे कोणत्याहि प्रादेशिक भाषेशीं तिची अवेळीं स्पर्धा सुरू होणार नाहीं, किंवा तीमुळें प्रादेशिक संस्कृतीची पायमल्ली



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

होणार नाहीं. व्यवहारोपयोगी नवीन भाषा बनविण्याचे Esperanto सारखे युरोपमध्यें अनेक प्रयोग झाले व ते सर्व निष्फळ ठरले हें लक्षांत घेतां असा कोणताहि प्रयोग सुरू करण्याच्या पूर्वी सर्व बाजूंनीं विचार केला पाहिजे. युरोपमध्यें निरनिराळीं स्वतंत्र राज्यें होतीं व आहेत हें Esperanto सारख्या सर्वसाधारण भाषेच्या आड येणारें एक प्रमुख कारण होतें. शिवाय सर्वांना सारखीच सुलभ होणारी भाषा बनविणें हें तेथें निरनिराळीं बरींच भाषाकुटुंबें असल्यामुळें बरेंच भानगडीचें काम होतें. हिंदुस्थानांत या दोन्ही अडचणींनीं बरेंच सौम्य स्वरूप धारण केलें आहे. एक तर स्वतंत्र हिंदुस्थान आतां एकराज्य झालेलें आहे व दुसरें हिंदुस्थानांत प्रमुख भाषाकुटुंबें फक्त दोनच आहेत. वैदिक, संस्कृत, निरनिराळ्या प्राकृत आणि निरनिराळे अपभ्रंश या मार्गांनींच आलेल्या हिंदुस्थानच्या भाषांची संख्या बरीच मोठी आहे आणि त्यांचें भाषाकुटुंब एकच आहे. दुसरें भाषाकुटुंब हें द्राविडीभाषांचें कुटुंब होय. या द्राविडी भाषांनीं वर उल्लेखिलेल्या संस्कृत कुटुंबाशीं चांगला संबंध जोडला आहे. या दोन भाषाकुटुंबांशिवाय उल्लेखनीय असें तिसरें भाषाकुटुंब हिंदुस्थानांत नाहीं. ऑस्ट्रिक भाषेचे कांहीं अवशेष आपल्याकडे सांपडतील. फारसी या इराणी कुटुंबांतील व आरबी या सेमिटिक कुटुंबांतील कांहीं शब्दभांडार आमच्याकडे आलेलें आहे. पण या फारसी व आरबी शब्दांपैकीं कांहीं आमच्या स्थानिक भाषांनीं आत्मसात् केले आहेत आणि दुसरे जे कांहीं अलबतेगलबदे शब्द आहेत ते आज जवळजवळ नामशेष झाले आहेत. या परिस्थितीमुळें नवीन भाषा बनविणें आपल्यास बरेंच सुकर जाईल.

## सर्वजनसुलभ ' हिंदवी ' बोली

या आपल्या भाषेचा पायाहि आपणाला आज उपलब्ध आहे. आसेतुहिमाचल व हिंदुस्थानांतील आबालवृद्धांना थोडीबहुत परिचित असलेली जर कोणती बोली ( भाषा नव्हे ) असेल तर ती ही कीं ज्या बोलीला सामान्यजन हिंदी किंवा हिंदुस्थानी म्हणतात पण जीमध्यें हिंदी किंवा हिंदुस्तानीच्या व्याकरणाचा पत्ता नाहीं; जिच्यामध्यें कोणत्या भाषेंतून नवीन शब्द घ्यावेत याला निर्बंध नाहीं; जी असे अनेक शब्द घेऊन त्यांना स्वतःला योग्य वाटेल तें स्वरूप देते; जिला कोणतीहि एक लिपि नाहीं —कारण ती अजून ग्रंथनिविष्ट झालीच नाहीं आणि त्यामुळें निरनिराळ्या प्रांतांतील लोक जिला लेखनिविष्ट करण्याचा प्रसंगच आला तर ती आपापल्या लिपींत लिहितात; जिच्यावर कोणत्याहि वैयाकरणाला किंवा भाषाशास्त्रज्ञाला आज सत्ता गाजवितां येत नाहीं; जी उत्तम व्यवहारोपयोगी आतांच बनली आहे व जिला कांहीं लोक ' बझार हिंदी ' म्हणतात ती बोली. आपण तिला तिचें मूळचें नांव ' हिंदवी 'च देऊं. दिल्लीच्या आसमंतांतच हिचा जन्म झाला. पण दिल्ली मुसलमानांच्या ताब्यांत गेल्यावर तिच्यावर मुसलमानांनीं फारसी-आरबी लेणीं घालून तिला नटविण्याचा प्रयत्न केला. मुसलमानांची सत्ता थोडी कमी झाल्यावर हा भ्रष्टाकार झाला असें वाटून हिंदूंनीं तिच्यावरून हीं फारसी-आरबी लेणीं काढून भिरकावून दिलीं व त्याऐवजीं तिच्यावर संस्कृत आभरणें तिचा जीव गुदमरून जाईपर्यंत चढविलीं. पण बादशाही किंवा नागरी करण्याचे हे प्रयत्न तिला मानवले नाहींत. स्वैरपणें खेडोपाडीं आणि सर्व देशभर लेण्यांआभरणांशिवाय फिरण्याची तिला अत्यंत हौस असल्यामुळें तिनें तिला भूषविण्याच्या या दोन्ही प्रकारांकडे पाठ फिरविली. आणि मौलवी-पंडितांचा सहवास सोडून ती खरी लोकप्रिय आणि लोकमतानुयायी बनली. हिंदुस्थानांतील वीस पंचवीस कोटी लोकांना समजणारी जी हिंदी म्हणून नामाभिधान पावलेली बोली ती हीच होय. उर्दू हिंदुस्तानी आणि नागरी हिंदी या दोन्ही भाषांहून ही साफ निराळी आहे हें समजण्यासाठीं तिला तिचें मूळचें नांव जें ' हिंदवी ' तें आपण द्यावें असें मला वाटतें.

हिचें व्याकरण अत्यंत परिमित आहे. लिंगवचनांचा, प्रत्ययांचा व शब्दविकारांचा गोंधळ हिच्यांत फारच कमी प्रमाणांत आहे. हिला ' उसका लाठी ' आणि ' नया किताब ' असें म्हणतां येते, ' उसकी लाठी ' आणि ' नयी किताब ' म्हणण्याची जरूरी नाहीं. ' बात ' चें अनेकवचन ' बातें ' असें करण्याच्या भानगडींत ही पडत नाहीं. ' सब बात ' असें









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

म्हणून हिचें भागतें. 'उसका हाथसे लो' असें म्हटलेलें तिला चालतें. 'उसके हाथसे लो' म्हणण्याची जरूरी तिला भासत नाहीं. 'हम लोग जाता है', 'तुम लोग आया था' असेच प्रयोग हिला जास्त मानवतात. 'हम रोटी खाया' च्या ऐवजीं 'हमने (किंवा मैने) रोटी खाई' असें ती सहसा म्हणणार नाहीं.

या बोलींत अस्पृश्य शब्द मुळींच नाहींत. वाटेल त्या भाषेमधून जसजसे जरूर पडतील तसतसे या बोलीनें आजपर्यंत शब्द उचलले आहेत, आणि तिला योग्य वाटलें तें स्वरूप त्यांना दिलें आहे. असे शब्द घेण्यावर निर्बंध असेल तर तो एवढाच कीं ते सहज समजण्यासारखे आणि सहज उच्चार करतां येतील अशा स्वरूपात पाहिजेत. पंडितांना विचारून का तिला 'फलाट' हा शब्द प्रचारांत आणतां आला असता ? आगबोट, हवागाडी, बिजलीबत्ती, किसान-संघ, मजदूर-संघ, तेजी-मंदी इत्यादि शब्द या बोलीनें सरकारला किंवा पंडितांना विचारल्याशिवाय आत्मसात् केले आहेत.

## राष्ट्रभाषा-समितीची जरूरी

या हिंदवी बोलीच्या वाढींत सरकारनें किंवा मौलवी-पंडितांनीं आजवर हात घातला नाहीं त्यामुळेंच ही बोली आपल्या नवीन राष्ट्रभाषेचा पाया म्हणून घेणें शक्य झालें आहे. इंग्रजी भाषेच्या वाढीचा इतिहास या बाबतींत अभ्यसनीय आहे. नॉर्मन लोकांनीं इंग्लंडचा ताबा घेतल्यावर व सरकार-दरबारीं नॉर्मन-फ्रेंच भाषा प्रचलित झाल्याबरोबर, जुन्या इंग्रजीवरची (Anglo-Saxon वरची) सरकारची व पंडितांची पकड उडाली. तिला स्वैरपणें आपला जम बसवितां आला. व्याकरणाचे निर्बंध सुटले. प्रत्यय संपुष्टांत आले. अमुकच ठिकाणाहून व अमुकच स्वरूपांत बाहेरचे शब्द घेतले पाहिजेत असा आग्रह धरणारे कोणीच उरले नाहींत; त्यामुळें नॉर्स, फ्रेंच, लॅटिन इत्यादि भाषांमधून जरूर पडली तसतसे नवीन शब्द भाषेंत घेण्यांत आले. सामान्य लोकांना मानवतील अशाच स्वरूपांत त्यांचा इंग्रजी भाषेंत प्रवेश झाला. उच्चारांतहि सुलभतेच्या मार्गानें फरक पडत चालले. या अशा रीतीनें ही भाषा सुधारल्या-वर तिला सरकारमान्यता आणि पंडितमान्यता मिळाली. अशा तऱ्हेनें इंग्रजी ही आज जगाच्या उत्तम व समृद्ध भाषांपैकीं एक बनली आहे.

हें उदाहरण लक्षांत घेऊन आपण आज जर या सहजसुंदर, उत्तम बांध्याच्या, धडधाकट प्रकृतीच्या, व्याकरणाच्या पथ्यपाण्यास तुच्छ लेखणाऱ्या, वाटेल तेथें बिनदिक्कत प्रवेश करणाऱ्या हिंदवीस राष्ट्रभाषेच्या उच्च स्थानावर बसविलें व तिच्या दिमतीला एक योग्य राष्ट्रभाषासमिति ( Academy of the National Language of India ) दिली, तर आपल्यापुढील हा अत्यंत क्लिष्ट प्रश्न कायमचा सुटेल असें मला वाटतें. या समितीनें मात्र आपल्या अधिकाराच्या योग्य त्या मर्यादा पाळूनच आपलें काम केलें पाहिजे. जिवंत भाषांच्या बाबतींत वैयाकरणांचें व भाषाशास्त्रज्ञांचें योग्य काम म्हणजे व्यवहारांत त्या भाषा कशा वापरतात, त्या कोणतें स्वरूप घेतात, याची नोंद करण्याचें आहे. पण अधिकारावर आलेल्या पुष्कळ माणसांना आपल्या खऱ्या कर्तव्याचा विसर पडतो व ते आपला अधिकार गाजविण्यास पुढें सरसावतात. कसें बोलावें आणि कसें लिहावें हें ठरविण्याचें काम वैयाकरणांचें नाहीं. निरनिराळे लोक कसें बोलतात व कसें लिहितात याची नोंद करण्याचें काम त्यांचें आहे. हें आपलें कर्तव्य ओळखून या समितीनें आपलें काम केलें पाहिजे. या समितीवर कांहीं भाषाशास्त्रज्ञ पाहिजेतच, पण त्यांच्याबरोबरच इंग्रजीचे आणि संस्कृतचे ज्ञाते आणि हिंदुस्थानच्या निरनिराळ्या मुख्य प्रादेशिक भाषांचे प्रतिनिधी पाहिजेत. या समितीनें या भाषेचें व्याकरण काय आहे तें पाहिलें पाहिजे. या भाषेंत आज शब्द कोणते आहेत व कोणते शब्द ती आत्मसात् करूं शकेल हेंहि पाहिलें पाहिजे. बऱ्याच प्रादेशिक भाषांना साधारण असे जे शब्द आहेत ते साहजिकच या भाषेंत प्रथम निविष्ट होतील. पण त्यानंतर राज्यकारभाराच्या सोयीकरतां व संस्कृतीच्या पोषणाकरतां जें शब्दभांडार लागेल त्याचाहि या भाषेंत सुखानें समावेश कसा करतां येईल हें या समितीनें पाहिलें पाहिजे. प्रथमतः राज्यकारभारास उपयोगी पडतील अशा शब्दांचा भरणा करण्याच्या उद्योगाकडे या समितीनें आपलें लक्ष दिलें पाहिजे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

## नवीन हिंदवीची लिपि

या समितीकडे खरा अधिकार या भाषेचें व्याकरण बनवण्याचा राहील. रोमन लिपि आज हिंदुस्थानाबाहेर मोठ्या प्रमाणांत प्रचलित आहे. ती निर्दोष नसली तरी तिच्यांतील दोषांची संख्या बरीच कमी आहे. प्रत्येक उच्चार तिला स्पष्टपणें दाखवितां येत नाहीं. छापखाना व टाइपरायटर यांच्या सोयीसाठीं संज्ञा शक्य तितक्या कमी करण्याकडे ओढा असतो. Diacritical marks ची पुष्कळदां जरूरी पडते. भाषा ज्यांना चांगली अवगत असते त्यांना ती वाचण्यांस अडचण पडत नाहीं. पण हा कांहीं लिपीचा मोठा गुण नाहीं. आरबी लिपीमध्यें स्वरांचा बराच लोप करतात, तरी ज्यांना या लिपीमध्यें लिहिलेली भाषा येते त्यांना त्यामुळें फारशी अडचण भासत नाहीं. इंग्रजीमध्यें जरी स्वरसंज्ञा फक्त पांचच आहेत तरी खरे स्वर यांच्या दुपटीपेक्षां जास्त आहेत. ज्यांना ही भाषा चांगली येते त्यांची त्यामुळें फारशी अडचण होत नाहीं. पण या लिपीमध्यें हा दोष आहे हें कबूल करावेंच लागेल. मराठीमध्यें ऱ्हस्व 'ए' किंवा ऱ्हस्व 'ओ' दाखवतां येत नाहीं. 'रामाचा' या शब्दांतील 'चा' आणि 'चार' या शब्दांतील 'चा' हे निरनिराळे दाखविण्याची व्यवस्था नाहीं. छापखान्याच्या सोयीकडे विशेष लक्ष दिलें गेल्यामुळें उच्चारानुसारी लेखन होण्याऐवजीं लेखनानुसारी उच्चार होण्याकडे प्रवृत्ति होते. पण तेंहि पुस्तानें होणें शक्य नसल्यामुळें पुढें पुढें उच्चारांत व लेखनांत अवास्तव फरक पडत जातात. इंग्रजीवर ही आपत्ति फारच मोठ्या प्रमाणावर कोसळली आहे. आपल्याकडे उच्चारानुसारी लेखन करावें असें म्हणणारे पुष्कळच लोक आहेत. पण प्रत्यक्ष व्यवहारांत या कामांत वाजवीपेक्षां बरीच जास्त तडजोड झालेली आपल्या पाहाण्यांत येते. लिहावयाची लिपि व वाचावयाची लिपि यांचीं वैशिष्ट्यें थोडीं निरनिराळ्या स्वरूपांचीं असल्यामुळें पुष्कळ भाषांमध्यें अशा निरनिराळ्या लिप्या अस्तित्वांत आहेत. मराठींत बालबोध व मोडी याच कारणांमुळें प्रसृत झाल्या. इंग्रजीमध्येंहि अशा निरनिराळ्या लिप्या आहेतच. या निरनिराळ्या लिप्यांमध्यें शक्य तितका कमी फरक पाहिजे हें लिप्या ठरविणाऱ्यांनीं पाहिलें पाहिजे. रोमन लिपीमध्यें एक उत्तम गोष्ट आहे ती म्हणजे ती साधारणपणें एका पातळींत लिहिता येते. त्यामुळें ती वाचण्यामध्यें फार वेळ मोडत नाहीं. आपली देवनागरी लिपि तीन पातळींत असते. ऊर्ध्वलिखित आणि अधोलेखित अशा निरनिराळ्या दोन पातळ्या सांभाळून मधल्या पातळींत आम्हांला आमच्या बहुसंख्याक अक्षरांचा समावेश करावा लागतो. त्यामुळें ही लिपि लिहावयास व वाचावयास वाजवीपेक्षां जास्त वेळ लागतो. या व यासारख्या दुसऱ्या अनेक अडचणी लिपि ठरविणाऱ्याच्या मार्गांत आहेत. तरी या सर्व लक्षांत घेऊन व देवनागरी ही लिपि आपल्याकडील बऱ्याच भाषांनीं थोडाबहुत फरक करून उचलली आहे हेंहि लक्षांत घेऊन आपल्या या नवीन हिंदवीची लिपि या समितीनें ठरवावी असें मला वाटतें. एकंदरींत रोमन लिपीपेक्षां देवनागरीची सुधारून काढलेली आवृत्तीच या हिंदवीला मानवेल असें आज तरी मला वाटतें.

ही जी समिति नेमावयाची ती कायमची समिति म्हणूनच नेमली गेली पाहिजे. फ्रान्समध्यें अशा प्रकारची समिति आहे आणि तिच्याकडून फार महत्त्वाचें काम झालें आहे. इंग्लंडच्या Academy मार्फत झालेलें काम त्या मानानें अल्प आहे. हिंदुस्थान हा देश इंग्लंड किंवा फ्रान्स या देशांपेक्षां बराच जास्त विस्तृत असल्याकारणानें व या देशामध्यें बरीच विविधता असल्याकारणानें अशा समितीची येथें जास्त जरूरी आहे.

[ या लेखांतील ऐतिहासिक माहिती व इतर कांहीं महत्त्वाचे भाग डॉ. सुनीतिकुमार चतर्जी यांच्या Indo-Aryan and Hindi या पुस्तकावर आधारलेले आहेत. पण माझ्या सर्वच विचारसरणीला आणि माझ्या निष्कर्षाला त्यांची सर्वथैव मान्यता आहे असें मानणें योग्य होणार नाहीं. — लेखक ]



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

# वाल्मीकीस

[ राम जन्मण्याच्या आधीं रामायण लिहिलें म्हणून वाल्मीकि हा द्रष्टा असा त्याचा गौरव करण्याची पद्धत आहे. कविवर्य तांब्यांच्या ‘ जय वाल्मीकी ’ या सुप्रसिद्ध कवितेंतहि याचा उल्लेख आहे. पण जेथून त्याच्या काव्याला आरंभ झाला तें पहिलेंच अनुष्टुभ् मात्र खरें ठरलेलें दिसत नाहीं. सौंदर्याचा, शुचितेचा, साधुत्वाचा नाश करणाऱ्यांनाच जग अजूनहि 'प्रतिष्ठा' देत आहे.]

काव्याला दिधला जन्म तुवां वाल्मीकी
क्षण वाटे तुटलें अंतर भूस्वर्लोकीं
संस्कृती मानवी मंडित ज्या किमयेनें
त्या काव्यशक्तिचा लाभ तुझ्या प्रतिभेनें

यश उज्ज्वल तव हें अधिक उजळण्यासाठीं
ती क्रांतिदर्शिता, द्रष्टेपण तव मुकुटीं
रोंविती आग्रहें अंधभक्त तव सारे
का मान्य तुला हे मिथ्या—स्तवन—फुलोरे ?

रचिलीस कथा ती श्रीरामाची जेव्हां
जन्मलाहि नव्हता रघुकुलनायक तेव्हां
विख्यात जरी हें, शंका मनिं परि येते
जगिं नित्य पाहतां क्रौंचमिथुनमृगयेतें

विसरलास का ती वाणी त्या शापाची
जें शोक तुझा घे उत्कटता श्लोकाची
पावतो ‘ प्रतिष्ठा ’ निषाद जगतीं आज
हांसतो तुला अन् धनुष्य करितो सज्ज !

—जयंत जोग

# नको मूर्तिप्रभंजका

नको मूर्तिप्रभंजका येऊं माझ्या देवळांत
नको फोडूं माझी मूर्ति घोर करून आघात १

माझी मूर्ति लहानशी माझें देवालय सान
परि सांठले तयांत सारें उज्ज्वल जीवन २

रानांतील अविनाशी वेंचूनिया दिव्य-शक्ति
ओतूनिया सत्सौंदर्य घडविली माझी मूर्ति ३

महात्म्यांची, महंतांची अमर्याद सेवावृत्ति
घेऊनिया कणकण घडविली माझी मूर्ति ४

अंगीं स्फुरली जयांच्या अलौकिक आत्मशक्ति
त्याच शक्तीचें प्रतीक घडविली माझी मूर्ति ५

हिमगिरीसम ज्यांची अविचल मनःशांति
त्याच शांतीस पूजाया घडविली माझी मूर्ति ६

ज्यांत जीवनाची आशा ज्यांत जीवनाची शक्ति
ज्यांत जीवनाचें रूप तीच माझी पूजा-मूर्ति ७

वेड्या मूर्तिप्रभंजका विनवणी ही म्हणून
नको नको मूर्तीवर करूं आघात निर्घृण ८

—श्रीनिवास कोलेंकर



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. त्र्यंबक शंकर शेजवलकर

# नवा इतिहास कसा अ[illegible]?

## इतिहासविषयक दृष्टीचा इतिहास

इतिहासाचा आरंभ वीरांच्या अद्भुत कथा भाटांनीं गाण्यापासून झाला. महाभारत हेंहि मूळ पवाड्याच्या रूपाचेंच होतें. त्यांत आधुनिक शाहिरांच्या पद्धतीप्रमाणें कांहीं भाग गद्य व कांहीं पद्य असा सरमिसळ असे. आजच्या महाभारतांत फारच थोडा गद्य भाग, केवळ मूळ त्याचें स्वरूप काय होतें तें सूचित करण्यापुरता, शिल्लक राहिला आहे. नंतर या ग्रंथाला पुराणांचें स्वरूप येऊन त्यांतील केवळ पद्यसंहिता तेवढी सूतांच्या पठनांत शिल्लक राहिली. आद्य ग्रीक कवि इतिहासकार होमर याच्या काव्याची रचनाहि त्याच स्वरूपाची आहे. हेराडॉटसनें आपला गद्य इतिहास अद्भुत, क्वचित् घडणाऱ्या अशा गोष्टी सांगण्यासाठींच लिहिला. मागील लोकांचे अद्भुत पराक्रम कालाच्या ओघांत वाहून जाऊन नष्ट होऊं नयेत, त्यांतील चांगल्या गोष्टी पुढच्यांस अनुकरणीय वाटाव्या, वाईट व दुर्गुणाच्या गोष्टी टाळण्याची बुद्धि त्यांना व्हावी, म्हणून त्या त्या गोष्टी जणूं नीतिपाठ म्हणून लिहून ठेवण्याचा प्रघात पडला. जगांतील कोठल्याहि देशांतील प्राचीन वीरांचीं वर्णनें वाचलीं तर तीं बहुधा त्यांच्या ठराविक साच्यातील सामाजिक, विशिष्ट प्रसंगींच्या वर्तणुकीचीं होतीं. त्यांत त्यांच्या वैयक्तिक चरित्राचा भाग क्वचितच पुढें मांडला जाई. मध्ययुगांत लोकांच्या वागणुकीच्या छटा इतिहासांत दिसूं लागल्या. केवळ मोठ्या राजपुरुषाचें, वीरांचें किंवा मुत्सद्द्यांचें चित्रण न करितां, ते ज्या समाजांत आपले पराक्रम करीत त्यांचाहि थोडाबहुत परामर्ष अनुषंगानें इतिहासलेखक घेऊं लागले. पण एखाद्या युगाचा यथातथ्य इतिहास समजण्यास सर्वच [illegible]-मोठ्या गोष्टींची नोंद अवश्य असते, त्यावांचून कार्यकारणभाव समजूं शकणार नाहीं, ही कल्पना या बखरकारांना नव्हती. कृष्णाजी अनंत सभासदानें शिवाजीचें चरित्र लिहिलें, पण त्याला संभाजीची कारकीर्द वर्णावीशी वाटली नाहीं. साष्टीच्या बखरकारानें पोर्तुगीजांच्या विरुद्ध मोहिमेचें तेवढें वर्णन केलें; पण त्याखेरीज इतर भोंवतालच्या राजकारणाची दखल घेतली नाहीं. भाऊसाहेबांचा बखरकार, त्याला विशिष्ट पक्षाचें मंडनखंडन करणें असल्यानें, पानपताच्या किंचित् मागें जाऊन मागील हकीकतहि सागतांना दिसतो. पण १९ व्या शतकाच्या आरंभापर्यंत, लोकांचा समग्र इतिहास लिहिला पाहिजे अशी कल्पनाहि आपल्यांत रुजली नव्हती. चिटणिसांनीं छत्रपतींच्या सांगण्यावरून त्यांच्या पूर्वजांची चरित्ररूप कथामाला गुंफली. सोहनीबुवांनीं फक्त पेशव्यांचेंच गुणवर्णन करण्यापुरती आपली लेखणी सरसावली. तोच प्रकार इतर सटरफटर बखरींचा. पण लोकांचा इतिहास ही कल्पनाच ग्रँट डफनंतर इकडे फैलावली. थोरांच्या वैयक्तिक नीतिअनीतीचें विवेचन बखरकार क्वचितच करीत. फक्त त्यांच्या कालानुरूप वागणुकीनें ते मोठीं कृत्यें घडविण्यास कसे समर्थ होते एवढेंच ते दाखवीत. गेल्या शतकांत जी इतिहासपरिपाठी रूढ झाली तिचाहि हेतु, फक्त अचूक माहिती पुढें आणणें व पक्षपातास थारा न देणें एवढाच होता. ज्या आधारावर इतिहासकार आपली हकीकत बनवीत, ती मुळांत खरी आहे कीं नाहीं एवढ्याचीच काळजी ते वाहत; पण पुढें अनेक सत्य गोष्टी अलग अलग उजेडांत आल्या









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तेव्हां असें आढळून आलें कीं, या सर्व गोष्टी एका-मागून एक देण्यानें त्या अनेक गोष्टींत एक सूत्र दिसूं शकत नाहीं. तेव्हा त्या गोष्टींमध्यें परस्पर-संबंध निर्माण करण्यासाठीं, इतिहासकार आपणच प्रश्न विचारून त्याची चिकित्सा करून उत्तरें पाहूं लागले व येणेंकरून इतिहासाला वेगळें स्वरूप प्राप्त झालें. नवीन विचिकित्सेनें नवीन इतिहाससाधनेंहि पुढें येण्यास मदत झाली व असलेल्या साधनांतील माहितीचे, वाक्यांचे व शब्दांचेहि अर्थ निश्चित होऊं लागले. पण त्याबरोबरच हुशार बुद्धीच्या चलाख लेखकांच्या विवेचनांत, इतिहासाला सोडून खंडन-मंडनाचा, असा बराचसा काल्पनिक भाग शिरूं लागला. आपणांसमोर सध्यां असलेला इतिहास हा अशाच स्वरूपाचा बनलेला आहे.

जुन्या इतिहासाचे कागद फारच थोडे सांपडत असल्याकारणानें, असलेली सर्व माहिती काला-नुक्रमें देणें एवढेंच इतिहासकाराचें काम बनतें. पण पुढच्या काळांत जास्त कागद व साधनें उपलब्ध झाल्यामुळें, इतिहासकाराला त्यांतील झाडून सर्व माहिती देणें शक्यच नसतें. म्हणजे आपोआपच तो असलेल्या माहितींतून निवड करूं लागतो. कोणती माहिती द्यावी व कोणती न दिली तरी चालेल, याचा विवेक तो स्वतःच्या बुद्धीनेंच करूं लागतो. निवड म्हटली म्हणजे ती कांहीं अनेक चिठ्ठयांतून मुलानें एखादी चिठ्ठी कोणताहि विचार न करतां उचलून देणें नव्हे. अर्थात् इतिहासकार त्याला जी गोष्ट इष्ट असते, ती सांगण्याच्या दृष्टीनें व तिचें मंडन होईल अशा हेतूनें आपोआपच निवड करीत जातो.

## इतिहासाचा निकष त्या त्या काळचाच

सध्यां प्रचलित असलेली इतिहासलेखनाची पद्धति परिपूर्ण नाहीं. तिच्यांत अंगभूतच अनेक दोष संभवतात. एखाद्या प्रकरणाचें नांव ठरवितांना सुद्धां इतिहासकार आपल्या हेतूचा आविष्कार करतांना दिसतो. पण एखाद्या काळांतील कोणत्याहि ऐतिहासिक व्यक्तीचें वर्तन तपासावयाचा निकष त्या काळांत माणसाच्या आयुष्याचें ध्येय काय समजलें जाई, कोणत्या गोष्टींना समाज बरें किंवा वाईट समजे, त्या काळांत माणुसकी कशाला म्हणत, पुरुषार्थ कोणत्या गोष्टींत सांठविलेला असे, या गोष्टींच्या निश्चयावर लावून पाहावा लागेल. त्या-खेरीज त्या त्या ऐतिहासिक गोष्टींना त्या त्या काळीं कां महत्त्व आलें होतें तें यथातथ्य समजणार नाहीं. राजकीय, सामाजिक व आर्थिक ध्येयांची माहिती असल्याखेरीज कोणताहि कालखंड आपणांस समजला असें म्हणणें चुकीचें होय. जुन्या काळां-तील कांहीं सामाजिक नियम आज वेडगळ वाटत असतील; सत्यासत्य-निर्णयाच्या रवादिव्यासारख्या पद्धती गैरहि वाटत असतील; पूर्वींच्या राजांना आपलें राज्य वाढवीत जाण्याचा राजनीतिशास्त्र-कारांचा उपदेश आज अनीतिमूलक वाटत असेल; पण त्यावर अवलंबून राहणारीं माणसें पारखतांना, त्यांची दखल घेतल्याशिवाय कोणताहि शेरा इति-हासकारास मारतां येणार नाहीं. आज अनाथ बालिका व विधवा यांच्या विवाहाचें मंडन करून कर्त्यांना आपण महापुरुष मानीत असतांना, आपणास जुन्या सतीच्या भावनेचा अर्थ यथातथ्य कळणें दूरापास्त आहे किंवा ब्राह्मणांच्या हातचें पाणी मिळत नाहीं म्हणून मैलोंगणती अरण्यांतून तहानेले चालत जाणें, हे आपणास आज समजूं शकणार नाहीं. जर आपल्याला त्या काळाची खरी कल्पना येईल, तर मग तत्कालीन कोणत्याच गोष्टींत आपणांस विसंगति वा असत्य, लज्जास्पद गोष्ट, किंवा टीकेस पात्र अशी रूढि आढळणार नाहीं.

मानवजातीचा खरा इतिहास म्हणजे त्यांतील वैयक्तिक वा सामाजिक वा राष्ट्रीय घडामोडी नव्हत; तर समाजाचीं ध्येयें, वेगवेगळ्या गोष्टींकडे पाह-ण्याची त्याची दृष्टि, हीं कशीं बदललीं हें समजून घेणें होय. हल्लीं आपण ' मनुष्यस्वभाव ' असा शब्द नेहमीं वापरतों, पण तशी कांहीं निश्चित, कायम व कालातीत अशी भावनांची वा कल्पनांची रचना मानवांत कधींच आढळत नाहीं. शूद्राला तप करतांना ऐकून प्रभु रामचंद्रानें त्याचें डोकें उडविलें, अशी हकीकत वाचून आज जे विद्वान् हिरवेपिवळे होतात, ते इतिहासाचे विद्यार्थी नव्हत. पूर्वींच्या काळीं किंबहुना आजहि आपल्या विचारकक्षेबाहेरच्या, म्हणजे आपणांस न समजत असलेल्या, लोकांचें वर्णन सर्वच लोक, रानटी, म्लेंच्छ, यवन, मागस-लेले अशा शब्दांनीं करतात. त्याला विशिष्ट





अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संस्कृतींत हीनतेचा, तुच्छतेचा वा शत्रुत्वाचा अर्थ चिकटतो. पण वस्तुतः त्याचा खरा ऐतिहासिक अर्थ, आपलें परक्यांबद्दलचें अज्ञान एवढाच आहे. वर सांगितलेल्या सर्व गोष्टी समजणें, उमजणें, आचरणांत आणणें व त्या समाजमनांत कायम प्रस्थापित होणें, हाच ज्ञानाचा आधार होय व त्याला तत्त्वज्ञान असें नांव देतां येईल. आणि मग त्या त्या काळच्या तत्त्वज्ञानाचीं उदाहरणें म्हणून ऐतिहासिक घडामोडींचा अर्थ आपणांस योग्य रीतीनें लावतां येईल.

## जुनें समजेनासें होतें !

अखिल मानवी खटाटोपांचा मुख्य हेतु मनुष्यासमोर उभ्या ठाकलेल्या प्रश्नांचा निकाल करणें हा होय. पण जुने प्रश्न सोडवीत असतांना, मानव आपल्या नव्या कल्पनेनुरूप नवीन प्रश्नहि उपस्थित करीत असतो. आपली आयुष्यसरणी काय असावी याबद्दल मानवाचें सतत संशोधन चालू असतें. मानवी आयुष्य कांहीं थोड्या ठराविक आचारसूत्रांनुरूप चालणारें नाहीं. त्याला सतत विचारांची सरणी चालू ठेवावीच लागते. जर कोणत्याहि कारणानें अशी विचारसरणी मध्यंतरीं बंद पडली, तर कांहीं काळानंतर त्या काळाचा अर्थ समजेनासा होतो. यास एक उदाहरण देतों. हिंदुस्थानांतील जुन्या देवळांवर अश्लील व बीभत्स चित्रें कोरलेलीं किंवा काढलेलीं दिसतात. आज तीं पाहून सर्वच्जणांना मान खालीं घालावीशी वाटते. ज्यांअर्थीं हीं उघड उत्तान शृंगाराचीं व कामशास्त्रांतील संभोगासनांचीं चित्रें, देवळांसारख्या पवित्र ठिकाणीं कोरलीं जात, त्याअर्थीं तीं कोरवून घेणारांची याबाबत काय भावना होती, कोणत्या कारणांनीं ते अशा गोष्टीस प्रवृत्त झाले, हें आजच्या पंडितांपैकीं कोणलाहि सांगतां येत नाहीं. प्रत्येक जण तर्कांचेंच जाळें गुंफतांना आढळतो. पण त्यानें समाधान होत नाहीं. याचा अर्थ, आपल्या समाजपरंपरेंत कोठेंतरी जबर तडाखा बसून खंड पडला व मग अर्थातच जुनें तें समजेनासें होऊन अद्भुत पांडवकृत्यांत समाविष्ट झालें, असा होतो. गेल्या शतकाच्या आरंभापर्यंत, हिंदुस्थानांतील लोकांस जुन्या कोरलेल्या लिपी वाचतांहि येत नव्हत्या. त्यांची मोडणी प्रिन्सेपसारख्या परकीयांनीं बसविली व आतां त्यांपैकीं बहुतेक वाचतां येतात. पण त्यांच्याहि पूर्वीं दोन अडीच-हजार वर्षें कोरलेली ' मोहेंजो दडो ' येथील चित्रलिपि अजूनहि कोणास उकलतां आलेली नाहीं. बाहेरच्या आघातांनीं स्वराष्ट्रांतील संस्कृति व पद्धति मोडली नाहीं, तर इंग्लंडासारखें बलिष्ठ राष्ट्र एकसंधि समाजाच्या पायावर निर्माण होतें. आपल्याकडे इतके धर्म व धर्मपंथ झाले कीं, आजच्या हिंदुधर्माचें म्हणजेच समाजाचें स्वरूप, अठरा धान्यांच्या कडबोळ्यासारखें संमिश्र झालेलें आहे. जुन्या अवशेषांवर नवे अवशेष चढत गेले व असें होत होत आजचा विचित्र समाज निर्माण झाला. मुख्यतः याच कारणामुळें त्याला परक्यांना तोंड देऊन स्वत्व रक्षिण्याची शक्यता अस्तित्वांत ठेवतां आली नाहीं.

## इतिहासापासून वेगवेगळे निष्कर्ष

असा विचित्र पाया लाभलेल्या आपलें कर्तव्य काय ? आपलें पूर्ववृत्त आपल्याला पुढेंहि नेहमींच बाधत रहावयाचें काय ? वस्तुतः तशी कांहीं आवश्यकता नाहीं. मानव हा स्वतंत्र आहे व इतिहासाची सरणीहि त्याच्या स्वाधीनच असते. कोणत्याहि बाह्य वा अमानुष, अतिमानुष शक्तीला त्यांत हात घालण्याचें प्रयोजन नाहीं. पण यासाठीं आपणच आपलें स्वातंत्र्य जागरूकतेनें राखण्याचा चंग बांधला पाहिजे. एकामागून एक येणाऱ्या पिढ्यांमध्यें जो आंतरिक संबंध असतो, तो कांहीं इतिहास पुस्तकांतील सनावलीप्रमाणें एकामागून एक येणाऱ्या तारखांच्या स्वरूपाचा नसतो. आपण जुनें ज्याप्रमाणें समजण्याचा प्रयत्न करूं, त्याप्रमाणें त्याची रचना आपणाला आज घडवितां येईल. हिंदुस्थानच्या जुन्या इतिहासापासून मुसलमान, शीख, जैन, बौद्ध व हिंदू वेगवेगळे निष्कर्ष काढतात व तदनुरूप आपली आजची आचारप्रणालिका ठरवितांना दिसतात. हिंदुसभावाले व राष्ट्रीय-स्वयंसेवक-संघवाले जो अर्थ लावतांना दिसतात, तो गांधीवादी काँग्रेसवाले व इतर लावतांना दिसत नाहींत. तर यांत खरें कोणाचें ? व कां ? सर्वच इतिहास आपण विसरलों तर सर्वच इडापीडा टळेल ! मग त्याचें कांहींच बंधन आपणांवर उरणार नाहीं व त्याचा उपयोग किंवा अडथळाहि



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

## नवा इतिहास कसा असावा ?

आपणाला होणार नाहीं. मार्क्सवादी कम्युनिस्टांनीं जगाच्या इतिहासाचा अर्थ एकप्रकारें लावून त्यावर आपलीं अढळ अशीं आचारसूत्रें बसविलीं आहेत व त्याप्रमाणें ते बेधडक वागत असतांना दिसतात. त्यांच्या कार्यास सर्व: जग विरुद्ध असूनहि त्यांना पुष्कळच यश येतांना दिसतें. आज जगांतील तिसरा हिस्सा लोकसंख्या त्यांच्या प्रत्यक्ष कक्षेंत गेली आहे व उरलेल्यांना त्यांचें ग्रहण लागूं पहात आहे. गांधीवादी हे स्वतःला कम्युनिझमवरील तोडगा समजतांना आढळतात. त्यांच्या आचारप्रणालींत मानवांना मोहनी घालण्यासारखें बरेंच कांहीं आहे, यांतहि संशय नाहीं. हिंदुस्थानांत त्यांची प्रणाली यशस्वी झालेली दिसते. पण तिलाहि कम्युनिस्टांना तोंड देतां येईल किंवा काय, याची खात्री वाटत नाहीं. महात्माजी स्वतः ऐतिहासिक पुरुष होते, तरी त्यांच्याएवढा अनैतिहासिक मनोवृत्तीचा माणूस इतिहासांत आजवर झालाच नसावा. ते विश्वामित्राप्रमाणें नूतन सृष्टीच निर्माण करण्यास निघाले होते व आपला मार्ग आचरतांना ते इतिहासाची फारशी परवा करतांना कधींच दिसले नाहींत. जुन्या इतिहासाचा किंवा खरें म्हटलें तर त्यांतील कांहीं गोष्टींचा आपल्या कामापुरता उपयोग करून घेण्यास ते चुकले, असें नव्हे. तेवढ्यापुरते ते व्यवहारदृष्टीच होते. पण इतिहासाचें जाळें त्यांना जखडून ठेवण्यास समर्थ झालें नाहीं, किंवा त्यांतील विचारांमुळें ते स्वतःच्या मार्गांत अडखळले नाहींत. ईश्वरावर नितान्त श्रद्धा व मानव हा स्वतःच ईश्वरी अंश आहे असा अचल विश्वास, यांच्या जोरावर ते इतर सर्व गोष्टींना जरूर तेव्हां धाब्यावर बसवूं शकत व आपल्याच मनोदेवतेच्या कौलाप्रमाणें पुढें जात. त्यांच्या या वागणुकीचा हिंदुस्थानवर काय परिणाम झाला तो पाहिला पाहिजे व तो पाहतांना जगाचा सभोंवतालचा इतिहाससुद्धां विसरतां येणार नाहीं.

इंग्रजांनीं हिंदुस्थान सोडल्यामुळें आपला एका नव्या कालखंडांत प्रवेश झाला आहे. इतिहास लिहितांना त्यांचा सासुरवास आतां आपल्यास बाध-

परक्यांसमोर आपल्याच हातांनीं कशीं मांडावीं, असा विचार यापुढें आपल्या मनांत येऊं देतां कामा नये. कारण आपल्या अंगभूत दोषांची चर्चा केल्याशिवाय आपलें स्वातंत्र्य राखणें आपणांस शक्य होणार नाहीं. नवीन इतिहास यापुढें लोकांच्या उद्योगांचा, घडामोडींचा, यशापयशाचा किंवा उत्कर्षापकर्षाचा लिहिला गेला पाहिजे. आतां राजे-महाराजे, सम्राट्, चक्रवर्ती इतिहासजमा झाले. तेव्हां त्यांच्या घराण्यांच्या अनुरोधानें इतिहासाचे कालखंड पाडण्याचें किंवा त्यांच्या घराण्यांतील लहानमोठ्या माणसांचें अकारण महत्त्व मानून त्यांच्या सटरफटर हकीकतींना इतिहासविषयांत स्थान देण्याचें यापुढें टाळलें पाहिजे. अशा प्रयत्नाला प्रथम पूर्णपणें यश येईल असें नाहीं. जुन्या इतिहासपरिपाटीचा कोणत्याहि इतिहासकारावर एवढा दाब असतो कीं, त्याला याबाबत सर्वस्वी अंग झटकून एकदम मोकळें होतां येणार नाहीं. पण नवीन आराखडा या अनुरोधानें आंखण्यास प्रत्यवाय नसावा. आजचे इतिहास वाचून त्या त्या काळांतील लोकांची परिस्थिति, सुख-दुःखें, चालीरीती, अडीअडचणी, हर्षामर्ष, उन्नति किंवा अधोगति, यांबद्दल कांहींच अनुमान वाचकांस करतां येत नाहीं. जुनीं सर्व मंदिरें, कोरीव लेणीं, ताजमहाल, हीं सर्व गरीब लोकांना पिळून त्यांच्या पैशावर व सक्तीच्या वेठीनें उभारलीं गेलीं होतीं असें मानलें, तर या सर्व जुन्या इमारती अकारण, निर्घृणपणें, त्या त्या जुलमी राजांचें स्मारक करणाऱ्या ठरतील. मग साम्यवाद्यांच्या मनोवृत्तीनें पाहिलें तर, त्यांचा चक्काचूर करणें योग्य ठरेल. पण ही इतिहासदृष्टि नव्हे. विचारवंत साम्यवादीहि अशा गोष्टीस संमति देतांना आढळत नाहींत. पण शहाजहानचा काळाचा इतिहास लिहितांना, केवळ ताजमहाल किंवा मोती-मशिद पाहून त्यांवरून लोकांच्या स्थितीचें अनुमान करणें खासच चुकीचें ठरेल. याबाबत विवेक करतांना इतिहासकारास दुसऱ्या अनेक गोष्टी लक्षांत घ्याव्या लागतील. गेलीं दीड-दोनशें वर्षांत आपल्या लोकांच्या [illegible] स्थितीचा इतिहास [illegible]



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पयोगी इतिहासांत त्यांना स्थान न मिळतां सामाजिक, आर्थिक, वाङ्मयीन, धार्मिक अशा वेगवेगळ्या इतिहासांच्या रूपानें ते पुढे मांडले गेले आहेत. यापुढील प्रयत्न या सर्वांचा समावेश मुख्य इतिहासांतच करून, त्यांचें अध्ययन सर्व नागरिकांकडून सक्तीनें व सुलभतेनें करून घेणें हा आहे.

### वर्णजातिभावनेचें थैमान !

हिंदुस्थानांतील इतिहासाची दुरवस्था होण्याचें आणखी एक कारण आहे व तें सर्व क्षेत्रांत थैमान घालतांना दिसतें. या देशाचा पिंडच वर्णजातिविवेकाच्या सामाजिक व धार्मिकहि पायावर आधारलेला असल्यामुळें, इतिहासक्षेत्रांतहि तिनें प्रवेश करावा हें अत्यंत स्वाभाविक होय. आपला संशोधनाचा उमाळा बहुधा जातीच्या अभिमानानें निर्माण झालेला आढळेल. येथें ज्ञानेश्वरदर्शन माध्यंदिनांनीं घडवावें, रामदासाचा पुळका ऋग्वेदी देशस्थांनाच यावा, नामदेवाचें संशोधन शिंप्यांनींच करावें, याच न्यायानें चोखामेळा, सेनान्हावी आदींची संशोधनें त्या त्या जातींकडून पुरस्कारिलीं जावीं असाच प्रकार बराच रूढ आहे. मागसलेल्यांतच असा प्रकार आहे म्हणावें, तर पुढारलेल्यांतीहि त्याचा संचार दिसतो. झांशीच्या राणीची पुण्यतिथि कऱ्हाडे ब्राह्मणसंघांत साजरी व्हावी हें दृश्य काय सुचवितें ? याबाबत ५०–६० वर्षांपूर्वी देशभक्तीच्या पहिल्या उमाळ्यांत जेवढा समंजसपणा दाखविला गेला तेवढाहि सध्यां दाखविला जात नाहीं. लोकमान्यांनीं शिवजयंत्युत्सव मराठ्यांच्या राष्ट्रीयत्वास पोषक म्हणून सुरू केला. त्या वेळीं राजवाडेप्रभृति संशोधकांनींसुद्धां शिवचरित्राचाच आदर्श म्हणून पुरस्कार केला. आणि अलीकडे पहावें तों बाजीरावउत्सव, चिमाजीआप्पा-पुण्यतिथि, रमामाधव-स्मृतिदिन, हेच पुढें सरसावले व त्यांच्या मानानें शिवाजीउत्सव कोठें कोपऱ्यांत जाऊन पडला ! जर हे सर्व उत्सव सर्व मराठ्यांनीं पुरस्कारून साजरे केलेले आढळते तर त्यांवर आक्षेप घेण्याचें कारण नव्हतें. पण अलीकडे त्यांचा परिणाम पहावा तर समाजांत एकीच्याऐवजी बेकीच घडवून आणतांना दिसतो. ब्राह्मणांनीं केलेल्या थेऊरच्या माधवराव-पुण्यतिथीसच काय, पण वढूच्या संभाजी-पुण्यतिथीवरहि ब्राह्मणेतर जवळजवळ बहिस्कार टाकतांना दिसतात. हा कशाचा परिणाम म्हणावा ? हिंदुधर्मत्राता म्हणून चिमाजीआप्पाचें वसईच्या किल्ल्यांत स्मारक करावयाचें तर, तेथेंच खिस्ती लोकांनीं वसईचें रक्षण केवळ मराठ्यांच्या दशांश फौजेच्या बळावर ज्याच्या पुढारीपणाखालीं केलें त्या पोर्तुगीज किल्लेदाराचा पुतळा त्यांनीं उभारावयाचा म्हटला तर कसें ? चाळीस लाख रुपये खर्चून चाळीस हजार सैन्याच्या बळावर जिवाचा आकान्त करून वसई घेणाऱ्या चिमाजीआप्पाचें शौर्य, चार लाख रुपये खर्चून चार हजार शिपायांच्या बळावर किल्ल्याचें रक्षण करून केवळ गोव्याची मदत तुटली म्हणून निशाण खालीं उतरविणाऱ्या किल्लेदारापेक्षां जास्त महनीय कसें ? पन्नास लाख मराठ्यांच्या राष्ट्रानें स्वभूमीवर पराक्रम केला तर तो जास्त अभिमानाचा विषय म्हणावा, तर दहा लाख वस्तीच्या पोर्तुगीज राष्ट्रा[ने] सगळ्या दक्षिण्यांविरुद्ध आपलें गोवें हजारों मै[ल] दूरच्या परभूमीवर आजवर रक्षावें हें केवढें आश्च[र्य] मानावें ? जर मानवजातीचा खरा इतिहास आपणां[स] जाणून घ्यावयाचा असेल, तर याबाबत इतिहास[ा]कारांस तरतमभावाचा फार मोठा विवेक कर[ून] इतिहास लिहावा लागेल हें उघड आहे. सृष्टीं[ची] भौतिक अनुकूलता कमी असणाऱ्या इस्लामी राष्ट्रां[नीं] सभोंवारच्या प्रदेशावर हजार वर्षें आक्रमण कर[ून] आपलें अस्तित्व इतरांच्या नाकावर टिच्चून गाजवा[वें] असलें दृश्य डोळ्यांसमोर दिसत असतां, त्य[ांना] म्लेंच्छ, यवन, रांगडे, रानटी, मागसलेले असे श[ब्द] लावून तुच्छ लेखणाऱ्या इतिहासकारास इति[हास] समजला असें म्हणतां येईल काय ? परका, आपल[्या]हून भिन्न आचाराचा व विचाराचा, माणूस ते[वढा] हलका किंवा मागसलेला समजण्याची प्र[वृत्ति] अज्ञानमूलक व दूषित नव्हे काय ? पण हाच प्र[कार] जगांत आजवर चालत आलेला आहे आणि या[चा] परिणाम जगांतील राष्ट्रांचे वा गटांचे संघर्ष चिरस्[थायी] होण्यांत झाला आहे. इतिहासाचा मुख्य उप[योग] गैरसमजुतीमुळें उद्भवलेले हे झगडे बंद कर[ण्यास] शिकविणें हा आहे. अखिल मानवजातीला कल्[याण]कारक असे इतिहास यापुढें तरी लिहिले ज[ातील] अशी आशा आपण बाळगूं या.









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. य. द. भावे

# ' प्रार्थना-मंदिरांतील खून '

## सव्यसाची इलिअट

१९४८ सालीं वाङ्मयाचें नोबेल पारितोषिक मिळविणारे जगद्विख्यात थॉमस स्टर्न इलिअट हे केवळ उत्कृष्ट कविच आहेत असें नसून ते महान् नाटककारहि आहेत ही गोष्ट त्यांच्या नाटकांपैकीं ' प्रार्थनामंदिरांतील खून ' ( Murder in the Cathedral ) हें वाचलें असतां सहज ध्यानीं येईल. या नाटकांत स्वभावचित्रण करण्यांतील व पात्रांच्या द्वारां एक सिद्धान्त वा तत्त्वज्ञानपर प्रमेय गुंफण्यांतील कौशल्य, ठायीं ठायीं विखुरलेलें दिसेल. वाङ्मय व तत्त्वज्ञान यांचा सुरेख संगम येथें झालेला आढळेल. हाडामांसाचीं माणसें निर्मिणें व तत्त्वज्ञानहि सांगणें ही अवघड गोष्ट करण्याचा विक्रम इलिअट यांनीं येथें करून दाखविला आहे. याचें गुह्य, तत्त्वज्ञ व कवि इलिअट यांची प्रतिभाच मुळीं नाट्यमय आहे, हें होय. वाङ्मयीन महात्मतेबाबत त्यांनीं काढलेले व त्यांच्या टीकालेखांत विखुरलेले उद्गार वरील विधानाची साक्ष पटवतील. ' Dialogue on Dramatic Poetry '- मधील एक प्रवक्ता जे उद्गार काढतो ते इलिअट यांच्या सर्व काव्याला यथार्थ लागूं पडतात :

" असें कोणचें भौतिक काव्य आहे कीं जें नाट्यमय नाहीं ? ग्रीक वाङ्मयसेवकांतील मार्शल सारखे सामान्य साहित्यिकसुद्धां नाट्यमय आहेत. होमर व दान्ते यांच्यापेक्षां दुसऱ्या कोणाचीं काव्यें ... बोलून वाळून

इलिअट यांच्या लहानसहान कवितांतून सुद्धां हा नाट्यगुण आढळेल. जे. आल्फ्रेड प्रूफ्रॉकचें प्रेमगीत ( The Love-Song of J. Alfred Prufrock ) किंवा गेरॉन्शन (Gerontion ) हीं त्यांचीं काव्यें वाचलीं असतां या विधानाची सत्यता पटेल. प्रूफ्रॉकच्या प्रेमगीतांत, मध्यम-वर्गांतील मध्यम वयाचा मवाळ प्रेमिक आत्मप्रकटी-करणाचा मिळमिळीत यत्न करतांना आढळेल तर दुसऱ्या कवितेंत गेरॉन्शन या वृद्ध माणसाचें भेदक चित्रीकरण आढळेल. मनांतील आंदोलनें, भावनांचे आघात व प्रत्याघात यांचें बहुरंगी स्वरूप वैशिष्ट्य-पूर्ण प्रतीकांनीं सूचित करून त्यांनीं हाडामांसाचीं दोन जिवंत माणसें आपणांपुढें उभीं केलीं आहेत.

तेव्हां अशा नाट्यमय प्रतिभासंपन्न साहित्यि-काचें लक्ष काव्याकडून नाट्याकडे वळणें अगदीं नैसर्गिक आहे. ' स्वप्नें मृगजळें पुरे झालीं आतां, निर्माण करूं जिवंत माणसें ' हा पाऊंड यांचा कार्य-क्रम होता. पण तो कार्यक्रम पाऊंडपेक्षां इलिअट यांनींच जास्त जोरानें अंमलांत आणला. जीवनांत शिव व अशिव हीं दोन्हींही आहेत व त्यांच्यांतील द्वंद्वांची यथार्थ जाणीव झालेला माणूसच त्यांना आपल्या कलाकृतींत पुनर्जन्म देईल व खरेंखुरें नाट्य निर्माण करील, ही गोष्ट इलिअट यांच्या ' प्रार्थनामंदिरांतील खून ' या नाटकावरून उघड होईल.

## इतिहास आणि साहित्य


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास




अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

म्हणण्यांत विशेषशी अतिशयोक्ति नाहीं. त्यांच्या सारख्या साहित्यिकाचें वाचन सृजनशील असतें. पण तें मनाचा—अर्धसुप्त मनाचा एक भाग बनल्यानें त्याची जाणीव जागृत मनाला रहात नाहीं. कांहीं वेळां बाह्यसृष्टींत घडणारी एकादी घटना सगळें अंतर्मन घुसळून काढते व ती जागृत मनाला एखाद्या नाट्यमय वा काव्यमय विषयाचें स्मरण करून देते आणि या अनुभूतीची अभिव्यक्ति साहित्यिक करूं लागला कीं मौलिक किंवा अमर साहित्य जन्मतें. असाच कांहींसा प्रकार 'प्रार्थनामंदिरांतील खून' (Murder in the Cathedral) यां नाटकाबाबत झाला असावा. इलिअट यांनीं मध्ययुगांतील इंग्लंडचा इतिहास वाचल्यानंतर, थॉमस अ बेकेट या संताच्या खुनाचा प्रसंग त्यांच्या मनांत घर करून राहिला असेल. कांहीं दिवसांनीं तो प्रसंग आपल्या मनांत राहिला आहे याची विस्मृतिहि त्यांना झाली असेल, पण केव्हां तरी आजच्या यंत्रयुगांतील मानवी मूल्यें व शाश्वतमूल्यें यांतील संग्राम पाहतां पाहतां त्यांना थॉमस अ बेकेटच्या मरणप्रसंगाची पुनः आठवण झाली असावी व त्या अनुभूतींतून हें नाटक बाहेर पडलें असावें.

बेकेटचा खून ही गोष्ट नाट्यमय खरीच. पण त्यांतील रोमांचकारित्व व नाट्य इंग्लंडचा इतिहास वाचीत असतांना इतकें लक्षांत येणार नाहीं. कारण इतिहासलेखक कोणचीहि गोष्ट जशी घडली असेल तशीच फक्त सनावळ्या वगैरे देऊन सांगतो. उलटपक्षीं तीच घटना साहित्यिक फारच निराळ्या तऱ्हेनें सांगतो. इतिहासज्ञांनीं रंगविलेला बेकेट निर्जीव व छायारूप आहे. त्यांत जिवंतपणा कोठेंच नाहीं. त्यासंबंधीं इतिहास आपणाला एवढेंच सांगतो कीं,

" दुसऱ्या हेन्रीनें (११५४–११९९) आपल्या राज्यांत पुष्कळ सुधारणा केल्या. या कामांत त्यास थॉमस अ बेकेट नांवाच्या एका विद्वान् व हुशार गृहस्थाची फार मदत झाली. त्यानें त्यास आपला मुख्य प्रधान नेमलें. न्यायदानाच्या बाबतींत, सरंजामी सरदारांच्या बाबतींत त्यानें अनेक सुधारणा केल्या. या सुधारणांप्रमाणें धार्मिक बाबतींतही कांहीं सुधारणा होणें आवश्यक होतें. या कामीं आपणांस आपल्या विश्वासांतील बेकेट या प्रधानाची चांगली मदत होईल म्हणून हेन्रीनें त्याला 'कँटरबरीचा आर्चबिशप' नेमलें. पण आर्चबिशप झाल्यावर त्यानें धर्माधिकाऱ्यांचा दर्जा व महत्त्व कमी होईल अशी गोष्ट करण्याचें नाकारलें. त्यामुळें त्याचें व हेन्रीचें बिनसलें. हेन्री व बेकेट यांच्यामध्यें या बाबतींत बरेच दिवस कलह चालला. शेवटीं हेन्रीस राग येऊन, 'या धर्माधिकाऱ्याच्या त्रासांतून मला सोडविणारा कोणीच नाहीं का?' असे त्यानें उद्गार काढले. हे उद्गार ऐकल्यावर हेन्रीच्या चार सरदारांनीं बेकेटचा निर्दयपणें खून केला (११७०). पण या गोष्टीमुळें हेन्रीवर सर्व लोक असंतुष्ट झाले. तेव्हां हेन्रीनें झालेल्या प्रकाराबद्दल पश्चात्तापपूर्वक क्षमा मागितली व बेकेटच्या थडग्यासमोर स्वतःस धर्माधिकाऱ्याकडून फटके मारवून घेतले."

इतिहासज्ञांनीं वर्णिलेला बेकेट व इलिअट यांनीं निर्मिलेला बेकेट यांत निर्जीव बाहुलें व चालताबोलता जिवंत माणूस एवढा मोठा फरक आहे. मध्ययुगीन ऐतिहासिक वातावरणाला विघातक अशी कोणचीहि घटना त्यांनीं आपल्या नाटकांत आणली नाहीं. पण कलेला, पात्रनिर्मितीला विघातक अशा किंवा जरूर नसलेल्या वायफळ बारीकसारीक गोष्टींना त्यांनीं रजा दिली. फक्त बेकेटच्या खुना मागील घटनेचा योग्य अर्थ त्यांनीं जाणून घेतला त्यांतील शाश्वत व अमर काय हें त्यांनीं बरोब हेरलें; आणि तेवढेंच त्यांनीं जगाच्या पुढें ठेवलें एखाद्या इतिहासकारासारखें किंवा शास्त्रीय चरित्रकारासारखें त्यांनीं बेकेटचा संपूर्ण जीवनपट, बारीकसारीक गोष्टींसह दाखविण्याचें ध्येय ठेवलेलें नाहीं. ठेवलें असतें तर कदाचित् केंद्रीकरणाच्या अभावा त्यांचा बेकेटहि निर्जीव झाला असता. यासाठ कीं काय त्यांनीं आपलें सर्व लक्ष बेकेटच्या उ आयुष्यांतील शेवटच्या वर्षावरच संपूर्णतया कें केलें. पूर्वायुष्यांतील त्याची कर्तबगारी त्य इतर पात्रांच्या द्वारां सूचित केली. खुनाच्या वे बेकेट व पूर्वायुष्यांतील बेकेट यांतील फरक तऱ्हेनें दर्शविला. पण पूर्वाश्रमींचा राजकारणी







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# ' प्रार्थनामंदिरांतील खून '

ढाल्या बेकेट व नंतरचा तत्त्वज्ञानी आध्यात्मिक बेकेट यांतील विरोधाभास नष्ट करून अंतकाळचा बेकेट हा पहिल्या बेकेटमधूनच मानसिक स्थित्यंतरें होत होत कसा जन्मला, हेंहि त्यांनीं कलात्मक सूचकतेनें वर्णिलें. अनैसर्गिकतेचा येथें लोप झाला आणि जेथें असें होतें तेथें अमर पात्रें निर्माण होतात. तीं चिरंजीवी असतात. इतिहासांतील क्लिओपात्रा व सीझर आपण जरी विसरलों तरी शेक्सपिअरचे क्लिओपात्रा व सीझर मनःफलकावर कायमचे चित्रित होतात. तसेंच इलिअट यांच्या बेकेटचें झालें आहे.

## संविधानक व रचना

हें नाटक एक शोकान्तिका वा दुःखान्तिका आहे. इलिअट यांनीं रचनेबाबत ग्रीक शोकान्तिकेची रचना जरी डोळ्यांसमोर ठेवली असली, तरी त्यांनीं त्यांत पदरचें कांहीं घालून नावीन्य आणलें आहे. पारंपारिक नाट्यप्रकारांतील चांगलें धुंडून त्यांत अभिनवता योग्य प्रमाणांत आणून एक नवीन नाट्यप्रकार त्यांनीं निर्मिला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. प्रत्येक कलावन्त आपल्या अनुभूतीच्या अभिव्यक्तीसाठीं योग्य असाच वाङ्मयप्रकार शोधून काढीत असतो. विशिष्ट वाङ्मयप्रकाराची निवड जेव्हां एखादा साहित्यिक करतो तेव्हां याचा अर्थ तो वाङ्मयप्रकार त्याच्या अनुभूतीच्या अभिव्यक्तीसाठीं सर्वथैव योग्य आहे असा घ्यावयाचा. वाङ्मयप्रकार व मनश्चक्षूंना दिसलेला देखावा वा अनुभूति आणि अभिव्यक्ति यांचा परस्परसंबंध मुख, मेंदू व मन यांच्याइतका निकट आहे.

या नाटकाची सुरुवात स्त्रियांनीं गायिलेल्या एका वृंदगीता–( Chorus ) नें होते. या वृन्दगीतांत काव्यगुण प्रकर्षानें आढळतो. तें गीत ग्रीक ' कोरस'ची आठवण करून देतें. शेक्सपिअरच्या कांहीं गीतांप्रमाणें, किंवा हार्डीच्या कादंबरींतील अडाणी खेडूताच्या संभाषणाप्रमाणें, हें गीत प्रथमतः भावनामय पार्श्वभूमि निर्माण करतें; बेकेट सात वर्षांनीं कॅन्टरबरीला परत येत आहे ही आवश्यक माहिती प्रेक्षकांना वा वाचकांना देतें आणि ग्रीक कोरसप्रमाणें

' येतो आहे वास अघटिताचा '[1]

हा अपशकुनी सूर काढून

' नियति आहे देवाच्या अधीन,
नोहे ती दासी राजपुरुषांची '

हें बजावून,

' जन्मेल निंदेच्या खाटेय्यांत पुनः देवाचा अंश ? '

हा प्रश्न विचारून,

' गरीबांना आम्हा नाहीं कसलाच कर्माधिकार,
फक्त व्हावयाचे षंढ साक्षीदार जें घडेल त्याचें ! '

असे बापुडे दीनवाणे उद्गार तें गीत काढतें. या वृन्दगीतांत, आणि पुढें येणाऱ्या धर्मोपदेशकांच्या संभाषणांत दैव, नशीब, कालचक्र, ' जें व्हावयाचें होऊं द्या भले ' असे शब्दप्रयोग वारंवार येतात. पुढें होणाऱ्या अशुभाच्या ओढणीची हीं प्रतीकें आहेत. त्यांचें कार्य अदृष्टाची भीषणता सूचित करण्याचें आहे; आणि हें कार्य तीं इतक्या परिपूर्ण रीतीनें करतात कीं वारंवार शेक्सपिअरच्या, युरिपाईडिसच्या, ॲस्किलसच्या, सिंजच्या दुःखान्तिकांची पुनः आठवण यावी. येथें शब्द जिवंत माणसेंच झाले आहेत जणूं !

वर निदर्शिलेल्या धर्मोपदेशकांचें संभाषण बेकेटच्या सात वर्षांतील कामगिरीबद्दल चालू असतें. इतक्यांत ' बेकेट येत आहे ' ही बातमी दूत घेऊन येतो. त्या दूताला ' शांति कीं युद्ध ? ' हा प्रश्न विचारला असतां दूताचें उत्तर येतें कीं,

' शांति दिसली, पण नाहींच शांतीचें चुंबन ?'

हें सांगण्यांत २ रा हेन्री व बेकेट यांमधील बेबनावाकडे प्रेक्षकांचे लक्ष वेधावें हा हेतु आहे. ' राजाचें पुनः तोंड पहाणार नाहीं ' ही बेकेटची प्रतिज्ञाहि तो दूत सर्वांच्या कानीं घालून निघून जातो. वातावरणांतील तंगपणा, जणूं उच्च बिंदूप्रत नेण्यासाठींच कीं काय याच वेळीं स्त्रिया दुसरें वृन्दगीत गातात. त्यांतील विषय

१ ' Murder in the Cathedral ' मधील



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

' बेकेट, सत्वरि जाई, परतून येऊं नको येथें
अशुभ पवन, भीषण सागर, धुकाटलें व्योम,
धुकें, धुकें, धुकें ! '

हा आहे. हें अशुभ-गीत धर्मोपदेकांना सहन न होऊन त्यांपैकीं एकजण ' बंद करा तें ' असें ओरडतो. इतक्यांत ज्याच्या प्रवेशासाठीं इतका वेळ पार्श्वभूमि रंगवून तयार झालेली असते व ज्याला पाहाण्याची प्रेक्षकांची उत्सुकता पराकोटीला गेलेली असते असा—

बेकेट प्रवेश करतो

बेकेटची उपस्थिति अत्यंत नाट्यमय आहे. त्याचें पहिलेंच भाषण ऐकून, आपल्यापुढें उभा असलेला माणूस हा पूर्वींचा उलाढाल्या राजकारणी बेकेट नसून ज्यानें आपलें संपूर्ण मनोविकार जिंकले आहेत असा संत आहे याची जाणीव आपल्याला ताबडतोब होते. आल्याबरोबर तो उद्‌गारतो :

" शांत रहा शांत.
गुंगू द्या तयांना त्यांच्या उन्मेषांत
वदती त्या शब्द, जयांचा अर्थ
अधिक गूढ शब्दांच्या पेक्षां—
तुमच्या सर्वांच्या उमजशक्तीच्या पलीकडे अर्थ.
समजे तयांना नि समजेहि न.
करणें कर्म होय भोगणें
आणि भोगणें म्हणजेच कर्म.
कर्ताहि नसतो कांहींहि भोगत
नि भोगणारेहि कर्म न करिती
दोघेहि स्थित ( fixed )
अमर कर्मात अमर भोगांत. "

यानंतर बेकेट लहानशा भाषणांत सत्यपरिस्थितीची जाणीव आपल्या शिष्यवृंदांना-धर्मोपदेशकांना करून देतो; आणि अगदीं या वेळींच मनोविकारांच्या जुलमांतून तपस्येनें मुक्त झालेल्या तपस्व्याला ऐहिक राजकारणाच्या डबक्यामध्यें परत ओढण्यासाठीं एकामागून एक चार ' फसवे ' येतात. येथें प्रेक्षकांना,तपस्व्यांना तपोभ्रष्ट करण्यासाठीं पुराणकालांत योजलेल्या मोहजालांची आठवण खासच होईल. हे चार ' फसवे ' आपल्या कामांत फारच कुशल असतात. त्यांपैकीं चौथा तर तत्त्वज्ञान बोलून, बेकेटचेच वर दिलेले शब्द-कर्म व भोगणें यासंबंधींचे-उद्गारतो. बेकेट गोंधळतो. याच वेळीं स्त्रियांचें वृन्दगीत, अशुभ चुकचुकते आहे, ही जाणीव करून देतें; आणि बेकेटचा शिष्यवृंदहि

"तुफानल्या लाटा, वारा उलटा,
वादळ वादळ
नका लोटूं नाव, वादळ वादळ,
थांबू या जरासे "

अशी धोक्याची सूचना देतात. बेकेटच्या मनांत भावनांच्या लाटा उसळतात, तुफान वारा उलटा वाहूं लागतो, विवेकबुद्धीची नाव आंदोलूं लागते. या द्वंद्वांत नाव बुडणार असें प्रेक्षकांना वाटूं लागते तोंच—

" स्पष्ट मार्ग माझा
मोहाला पुनः नाहीं मिळणार असा कधीं थारा "

असे बेकेटच्या तोंडून उद्गार बाहेर पडतात मोहाचें धुकें विरतें. वादळ थंडावतें. समुद्र शा[ंत] होतो. बेकेट या संग्रामांत यशस्वी होतो. हें द्वं[द्व] इतक्या कलात्मकतेनें रंगविलें गेलें आहे कीं तो [...] समरप्रसंग, आवडत्या गाण्याच्या लकेरीसार[खा] वाचकाच्या मनांत पुनःपुन्हा डोकावेल.

यानंतर ' मध्यन्तारिका ' ( Interlude ) अ[...] ती म्हणजे एक लहानसें प्रवचन आहे. नाटकका[रानें] या ठिकाणीं गद्य वापरलें आहे. गद्य वापरण्[याचें] कारण येथें भावनाविवशता कमी आहे हें [...] आर्चबिशपच्या या प्रवचनांत, ख्रिस्तानें आणले[ल्या] शांततेचा अर्थ व तिचें मर्म हा विषय असून, [...] असा आहे कीं— " बाळांनो, तुम्हांला मीं [...] पुनः कधीं कांहीं शिकवीन असें वाटत नाहीं. [...] थोडक्याच दिवसांत तुम्हांला एखादा नवीनच हु[...] दिसेल. " या लहानग्या मध्यन्तारिकेचा हेतु भ[...] काळाच्या उदरीं काय आहे याची थोडीबहुत क[...] वाचकांना वा प्रेक्षकांना यावी व ' असें [...] होणार कीं काय ? ' ही उत्कठा वाढावी हा [...]

' हुतात्म्यांचें जेथें रक्त सांडतें '

येथें नाटकाचा दुसरा भाग सुरू होतो. य[...] सुरुवात वृन्दगीतानें होते. धर्मोपदेशक प्रवेश क[...] इतक्यांत हेन्रीचे चार सरदार रंगभूमीवर [...] " कुठें बेकेट ? नृपाकडून आलों आहों अ[...] असें विचारतात.









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# ‘ प्रार्थनामंदिरांतील खून ’

नंतर बेकेटची व त्यांची मुलाखत झटपट होते. समजुतीच्या गोष्टीपासून दामापर्यंत सर्व मार्ग ते चार सरदार अवलंबितात व शेवटीं बेकेट कोणत्याही भुलावणीला बळी न पडल्यानें

“ राजन्यायासाठीं येऊं आम्ही पुनः तरवारीसह ”

अशी धमकी देऊन निघून जातात. वृन्दगीत पुनः चुकचुकतें :

“ मरणदूतांचा येतो आम्हां वास. ”

आणि धर्मोपदेशक बेकेटला कॅन्टरबरी सोडून जाण्याचा उपदेश करतात आणि ‘ निदान प्रार्थनेसाठीं तरी मंदिरांत चला ’ अशी त्याची विनवणी करतात. बेकेट मंदिरांत जातो. धर्मोपदेशक ‘दारें लावा दारें ’ असें ओरडतात; ‘ लागलीं दारें, सुखरूप आम्ही ’ असे उद्गार काढतात. पण मरणाचीं पावलें जवळ ऐकूं येत असतांना सुद्धां बेकेट धर्मोपदेशकांना

‘ उघडा दारें. दारें उघडा.
नका बनवूं प्रार्थनामंदिर लढाईचा किल्ला
शत्रूंनाहि पण येथें आहे जागा, दारें उघडा ’—

असें निक्षून सांगतो. धर्मोपदेशक त्याला तसें न करण्याची विनंति करतात. ‘ हल्ला करणारे आहेत पशू, वागवा ह्यांना पशुनीतीनें ’ असें ते सांगतात. त्या वेळीं बेकेट त्यांना प्रत्युत्तर देतो कीं,

“ नोहें अपुलें ध्येय यशाचें
रक्तलांच्छित हिंसायुद्धाचें
रक्तपिपासु प्रतिकाराचें
जिंकावयाचें फक्त आपणां
सहनशक्तीच्या त्यागशक्तीच्या
गुप्तधनावर ! ”

मरणकालींहि अविचल राहून अहिंसेचा संदेश देणारा बेकेट पाहात असतां हिंदी वाचकांना महात्मा गांधींची आठवण खास होईल.

इतक्यांत दारूनें तर्र झालेले सरदार तरवारी परजीत प्रवेश करतात आणि झटापटीच्या विद्युद्वाग्युद्धानंतर ते बेकेटचा खून करतात.

नवनीत इंग्रजी फोडतें :

कुजली जमीन, सडलें पाणी...
ये तूं यामिनी, स्थिर रहा येथें
तिष्ठ प्रभाकरा, स्तब्ध कर ऋतुं ”

सरदार आपल्या कृत्याचें समर्थन करतात :

“ मारला बेकेट देशकार्यासाठीं ! ”

धर्मोपदेशक दुःखांत मग्न होतात, पण परस्परांचें सान्त्वन करून, “ आजि जन्मला येथें दुजा संत ” याबद्दल देवाची प्रार्थना करून त्याला अभिवादन करतात.

आणि शेवटीं वृन्दगीताचा समारोप होऊन त्यांतून खालील संदेश उठतो :

“ रक्तदानदया जी दाविसी प्रभू,
त्यासाठीं करितों अभिवादन;
हुतात्म्यांचें जेथें रक्त सांडतें
ती भूमि होते शतशः संपन्न—
जन्मतात तेथें झरे-निर्झर
पृथ्वीला देत नवजीवन.
क्षमा करि देवा जगाचें पाप आमुच्या माथीं. ”

आणि पडदा खालीं पडतो. नाटकाची सुरुवात वृन्दगीतानें व शेवटहि वृन्दगीतानें होतो.

## द्रष्ट्यांच्या कपाळीं धोंडा

या दुःखान्तिकेचा नायक बेकेट आहे, हें सांगण्याची गरज नाहीं. ही दुःखान्तिका नियतिकृत नाहीं तर मानवकृत आहे. जगांत जन्मलेल्या पहिल्या संताच्या वधापासून गांधीजींच्या अमानुष खुनापर्यंत याच दुःखान्तिकेची पुनरुक्ति कैक वेळां झाली आहे. येशूचा क्रॉसवरील मृत्यु, सॉक्रेतिसाचें विषप्राशन, कॅन्टरबरीच्या देवळांतील बेकेटचा खून, आणि गांधीजींचा वध हीं एकाच दुर्घटनेचीं प्रतीकें आहेत. ‘ जेरुसलेम आपल्या द्रष्ट्यांना दगडांनीं मारून टाकतें ’, या वाक्प्रचारांत जो विषादपूर्ण अर्थ भरला आहे त्याची प्रचीति येथें आपल्याला येते.

बेकेट हा आपल्या पूर्वायुष्यांत उलाढाल्या राजकारणी पुरुष होता, पण उत्तरार्धांत तो ‘मुक्त’ पदवी-




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

पावेतों राजसत्ता त्याचा अनुनय करीत होती. पण ज्या वेळीं तो स्थलकालमर्यादेपलीकडे जाऊन नवीन प्रकाश पाहतो व नवीन ध्येयात्मक मूल्यें जगापुढें ठेवूं लागतो, त्या वेळीं दांभिक, व्यावहारिक, सत्तालोलुप जग त्याचा तिटकारा करूं लागतें. त्यानें परत जगाचीच रीत अनुसरावी म्हणून सर्वथैव यत्न केले जातात. मोहजालें विणलीं जातात. आमिषें दाखविलीं जातात. मरणाची धमकी पण त्याला मिळते. पण ज्याला प्रकाश दिसला तो माणूस परत खातेऱ्यांत, तिमिराच्या खातेऱ्यांत कशाला जाईल ? तो प्रकाशाकडे इतरांना नेण्याचा यत्न करील. पण राजसत्तेला त्याची ध्येयात्मकता व तिचीं मूल्यें यांचें यथायोग्य ज्ञान न झाल्यानें, बेकेट तिला " पंथीं पसरल्या कांट्यांपरि " बोंचूं लागतो. द्रष्टे फारच दूरचें पाहतात आणि बोलतात हें अज्ञानांत डुंबणारें व्यवहारी समजूं शकत नाहींत. ख्रिस्ताला मरावें लागतें आणि कैक वर्षांनीं त्याच्या शिकवणुकींतील मूल्यें अज्ञानी मानवाला कळतात. सर्व संतांचें असेंच आहे. द्रष्ट्यांचाहि हाच अनुभव. ध्येयवादी माणसांच्या नशिबीं हेंच !

'मरणांतहि अमर होत'

पण बेकेटसारखे, जवळजवळ गांधीजींच्या एक-प्रकारें अनासक्तियोगाची व अहिंसेची आठवण करून देणारे, स्थल व काल यांत इतर जनांप्रमाणें राहून स्थलकालांच्या मर्यादेपलीकडे जाणारे, महान् द्रष्टे व संत जगाच्या दृष्टीनें जरी मर्त्य झाले, अशिवानें शिवावर मात केली असें क्षणभर जरी वाटलें, तरी लोगेच "मुक्त झालेल्यांना ज्याला आपण 'मरण, मरण' म्हणतों असें नसतेंच " याची जाणीव होते. अशा 'मुक्त आत्म्यांना' मरणाची भीति कधींच वाटत नाहीं. 'दारें उघडा' असें बेकेट निक्षून सांगतो. महात्मा गांधी मरणाची दारावर टिचकी वाजली असतांना सुद्धां, " मला कोणताही बाह्य संरक्षणाचा सोपस्कार नको, माझी प्रार्थनेची जागा सर्वांना मोकळी आहे ", असें सांगतात. याचें कारण अविरत तपस्येनें बेकेट वा गांधीजी, मनोविकारांना जिंकून, प्रवृत्तींचें उदात्तीकरण करून मायामोहांपलीकडे गेलेले असतात. त्यांनीं आपुलें मरण आपल्याच डोळ्यांनीं पाहिलेलें असतें. ज्या तत्त्वांची आपल्याला मनोमन साक्ष पटली त्यांसाठीं हीं माणसें आपल्या रक्ताचा थेंबन्थेंब खर्ची घालतात; व खुद्द कृतान्त जरी पुढें उभा ठाकला तरी आपल्या व्रतापासून मुळींच चळत नाहींत. अशा महान् पुरुषांचा पार्थिव देह दांभिक सत्तालोलुपांनीं, किंवा अज्ञानी माथेफिरूंनीं 'देशकार्या'च्या नांवाखालीं नष्ट केला तरी त्यांचीं तत्त्वें अमर असल्यानें ते मरणांतहि अमर होतात. सॉक्रेटिसाला विषाचा प्याला प्यायला दिल्याबद्दल कांहीं वर्षांनीं कां होईना पण जगरीतीनें शहाणे ठरलेल्यांना खासच वाईट वाटलें असेल, येशूला मारल्याबद्दल पश्चात्ताप झाला असेल व या हुतात्म्यांचीं थोर तत्त्वें कशीं अमर आहेत याची जाणीव त्यांना झाली असेल. अज्ञानतिमिर प्रकाश गिळण्यांत जरी तात्पुरतें यशस्वी झालें तरी जगांत शेवटीं शिवमूल्येंच जगतात. तींच शाश्वत आहेत, अमर आहेत. म्हणून बेकेट अमर आहे ही जाणीव या नाटकाच्या प्रेक्षकांच्या व वाचकांच्या अंतःकरणांत उत्पन्न होते व अंतःप्रवृत्तींचें शुद्धीकरण व उदात्तीकरण होऊन ते उच्च प्रकारचा आनंद उपभोगतात. इलिअटसारखे साहित्यिक असा उदात्त आनंद अनुभवावयास देतात. यांतच वाङ्मयाची थोरवी व महत्त्व आहे.

पण, हा जो आनंद वाचकांना मिळतो याचें मर्म, स्थलकालाच्या मर्यादेपलीकडे जाऊन बेकेटच्या व्यक्तिमत्त्वाचा व खुनाचा चित्रपट पुनः पाहून त्या अनुभूतीची अभिव्यक्ति करतांना स्वत्वाहंकार संपूर्णतया बाजूला ठेवून, बेकेटच्या भूमिकेशीं तादात्म्य पावल्यानें जो रक्तामांसाचा, तुम्हां-आम्हांपेक्षांहि जास्त जिवंत बेकेट इलिअट यांनीं निर्माण केला, यांत आहे.

... आणि महाराष्ट्रांतील एखादा प्रतिभावान् नाटककार मराठी नाट्यवाङ्मयांत गांधीजींना पुनः जिवंत करून, 'मानव्याच्या अमरत्वा'ला कलेंत अमर करील का ?



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

प्रा. श्रीनिवास दीक्षित

# अहिंसा, लोकशाही व सत्याग्रह

## अहिंसा

हिंसा ही कृतींत नसते. माझ्या हातांतील तीक्ष्ण धारेचें शस्त्र दुसऱ्याच्या शरीरांतून आरपार गेलें म्हणजे मीं हिंसा केलीच असें होत नाहीं. अर्जुनानें युद्ध केलें. पण त्यानें हिंसा केली नाहीं. कारण हिंसा कृतींत नसते, वृत्तींत असते.

हिंसा वृत्तींत असते. हिंसक वृत्ति ती कीं, जीमध्यें क्रोध व द्वेष सामावलेला आहे. हिंसक वृत्तीचा अभाव म्हणजे अहिंसा.

अहिंसेसंबंधीं आतांच केलेलें विधान, व 'अहिंसा' हा शब्दप्रयोग हीं अकरणात्मक असलीं तरी त्या शब्दानें जी वृत्ति निर्दिष्ट केली जाते ती भावरूपच आहे. या भावरूप वृत्तीचा उगम जीवन-विषयक दोन श्रद्धांतून आहे.

त्यांपैकीं पहिली श्रद्धा अशी : जगांतील प्रत्येक मानव हा जीविताचें जें कांहीं परममंगल साध्य असेल त्याकरतांच सारे व्यवहार करीत असतो. कुठलाहि मनुष्य जें अमंगल आहे, जें अशुभ आहे त्याकरतां बुद्ध्या प्रयत्न करणार नाहीं. एखाद्या माणसाचे व्यवहार जें अशुभ आहे, जें त्याज्य आहे, त्याच्या दिशेनें होत असतील, तर त्याचा अर्थ इतकाच कीं, तो अज्ञानी आहे; खरोखर चांगलें काय आहे हें त्याला समजत नाहीं.

दुसरी श्रद्धा अशी : जें खरोखर मंगल आहे तें साऱ्यांनाच शुभ असणार. एखादी गोष्ट मला चांगली, पण दुसऱ्याला वाईट असें अंतिमतः असणें सिद्धान्त निघतो. तो असा कीं मांगल्याच्या साधनेचा माझाहि मार्ग चुकला असेल. अमुक एक गोष्ट मी करतों म्हणून ती योग्य असें होत नाहीं. माझी कृतीहि अयोग्य असेल. मी ज्याची सिद्धता करूं पहात आहें, तें अमंगल असेल, वाईट असेल. पण जोंपर्यंत त्याचा वाईटपणा, प्रयत्न करूनहि, माझ्या बुद्धीस आकलन होत नाहीं, तोंपर्यंत मी माझ्याच मार्गानें जावें हें ओघानेंच येतें.

अर्थात् ही मुभा इतरांनाहि असली पाहिजे. कारण, आपण सारेच मांगल्याच्या शोधांत आहोंत. जें खरोखर मंगल आहे, तें साऱ्यांनाच शुभ असणार. तेव्हां माझा मार्ग बरोबर असेल तर कालान्तरानें इतरांनाहि तो पटेल व माझा मार्ग ते अनुसरतील.

मग या परिस्थितींत मी इतरांवर रागवावें कां म्हणून व त्यांचा द्वेष तरी कां करावा ?

इंग्रजांनीं हिंदुस्थानवर राज्य करण्यानेंच जगांत मांगल्याची अभिवृद्धि होणार आहे असें चर्चिलला वाटलें. याउलट, हिंदुस्थाननें स्वतंत्र राहण्यांतच खरें कल्याण ( अर्थात् साऱ्या विश्वाचें, केवळ हिंदवासीयांचें नव्हे; कारण खरें कल्याण जर एकाचें असेल तर साऱ्यांचेंच असतें असा सिद्धान्त वर दिलाच आहे ) आहे, असा गांधीजींचा विश्वास होता. म्हणून अहिंसक गांधीजींची अशी वृत्ति होती कीं चर्चिलचें म्हणणें बरोबर असेल किंवा माझेंहि असेल. आपण दोघेहि सत्याच्या शोधांत आहोंत, जें कांहीं परममंगल आहे त्याच्या शोधांत आहोंत. जें सत्य आहे, तें आमच्या दोघांच्या परस्पर विरोधी

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मंगल आहे, तेंच पाहिजे आहे. तोहि माणूसच आहे. तेव्हां त्याचाहि शोध सत्यासाठींच असणार.

म्हणून मला क्रोधाचें किंवा द्वेषाचें कांहींच कारण नाहीं. उलट, माझ्यासारखीच मांगल्यासाठीं धडपडणारी एक व्यक्ति म्हणून त्याच्या व्यक्तित्वा-विषयीं मला आदर वाटला पाहिजे, प्रेम वाटलें पाहिजे. तो चुकतो आहे असें वाटलें, तरी प्रेम वाटलें पाहिजे. व्यक्तिमात्राविषयीं असणारी आदराची व प्रेमाची ही भावरूप वृत्ति म्हणजेच अहिंसा. शब्द अभावदर्शक असला, तरी वस्तु भावरूपच आहे. क्रोधाचा व द्वेषाचा अभाव हें या वृत्तीचें स्वरूप नव्हे, केवळ अनुषंगिक धर्म होय.

## लोकशाही

अहिंसेची ही भावरूप वृत्ति म्हणजे लोकशाहीचा आत्मा आहे. लोकशाहीचें सारसर्वस्व दोन कल्पनांत सामावलेलें आहे. त्यांपैकीं पहिली, ' प्रत्येक व्यक्तीस अंतिम मूल्य आहे ' ही. जितका मी महत्त्वाचा तितकाच इतर कोणीहि. एका व्यक्तीस दुसऱ्या व्यक्तीनें साधन म्हणून वापरावयाचें नाहीं, कारण प्रत्येक व्यक्ति ही अंतिम साध्य, अतएव आदरणीय आहे. पण लोकशाहींत दुसरीहि एक कल्पना अंतर्भूत आहे. ती ही कीं, एका अर्थानें प्रत्येक व्यक्ति ही साधनच आहे. व्यक्तिनिरपेक्ष मूल्याच्या सिद्धीकरतां प्रत्येक व्यक्तीचें जीवन हें एक साधन असल्यानेंच लोक-शाहींत व्यक्तित्वाविषयीं अत्यंत आदर दाखविला जातो. व्यक्तीला साध्य व साधन अशा दुहेरी दृष्टीनें पाहणें हेंच लोकशाहीचें सारसर्वस्व.

लोकशाहीस अभिप्रेत असलेलें व्यक्तिमत्त्वाचें हें पावित्र्य आणि व्यक्तित्वाविषयींचा आदर आणि वर सांगितलेली अहिंसक वृत्ति हीं एकरूपच नाहींत काय ? मात्र अहिंसा = लोकशाही असें समीकरण नाहीं. कारण लोकशाही हें कांहीं केवळ एका वृत्तीचें नांव नाहीं. त्यांत कृतीचाहि अंतर्भाव होतो.

या वृत्तीनें जोंपर्यंत व्यवहार होत आहेत तोंपर्यंत अहिंसेस बाध नाहीं. प्रत्यक्ष शारीरिक कृतीशीं अहिंसेचा संबंध नाहीं. वृत्ति अहिंसक असेल, तर युद्ध करणारा अर्जुनहि अहिंसकच होईल.

अहिंसेचें तत्त्व व्यवहारांत आणावयाचें म्हटल्यास कांहीं नियम पाळणें क्रमप्राप्त होतें. त्यांतील एक नियम असा कीं, सत्याच्या शोधाचा ज्याचा मार्ग आपणाहून भिन्न आहे, त्यास आपण मुदलींच नष्ट करा-वयाचें नाहीं. कारण तसें केल्यास सत्य शोधण्याचा एक मार्गच आपण बंद करतों. अखेर सारें सत्य अवतरतें तें व्यक्तीच्या द्वारेंच. पण आपण व्यक्तीच नष्ट करूं म्हटलें तर सत्याचा उदय होणार कसा ? माझाच मार्ग कल्याणाकडे नेणारा आहे असा अट्टहास अर्थात् अहिंसक वृत्तींत बसत नाहीं. कारण, वर म्हटल्याप्रमाणें प्रत्येक मानवाची प्रवृत्ति मांगल्याकडे असते या श्रद्धेंतून अहिंसावृत्तीचा उगम होतो. हृदयपरिवर्तनाचा सिद्धान्त यांतच अनुस्यूत आहे. तेव्हां स्वमतसिद्ध्यर्थ दुसऱ्याचें प्राणापहरण करावयाचें नाहीं असा एक नियम अहिंसातत्त्व व्यवहारांत आणतांना करावा लागतो. इतरहि बरेच नियम याप्रमाणें निघतात. या साऱ्या नियमांतूनच लोकशाहीचा सांगाडा तयार झाला आहे.

पण या लोकशाहीच्या सांगाड्यांतील आत्मा म्हणजे भावरूप अहिंसावृत्तिच होय. वाटल्यास असेंहि म्हणूं या कीं लोकशाही म्हणजे अहिंसेचा वस्तुपाठ, किंवा आचारधर्म. आपला मार्ग बरोबर असेल, तर कालान्तरानें तो इतरांनाहि पटेल. त्यांचें हृदयपरिवर्तन होईल. ह्या अहिंसक वृत्तीचा आचार, लोकशाहींत अल्पमतवाल्यांना बहुमत करण्याची जी संधि देण्यांत येते, त्यांत दिसून येतो.

## सत्याग्रह

दरी म्हटली कीं, ज्याप्रमाणें त्यांत डोंगर आलाच किंवा कोनाच्या कल्पनेंत त्याच्या दोन भुजांची कल्पना जशी अंतर्भूत आहे, किंवा पळीचा खोलवटा लक्षांत घेतल्यास विरुद्ध बाजूचा उंचवटा म्हणजे कांहीं निराळी वस्तु नाहीं, त्याप्रमाणेंच सत्याचा आग्रह म्हणजे अहिंसेची दुसरी बाजू आहे.

वर लिहिल्याप्रमाणें अहिंसावृत्ति ही दोन श्रद्धां-वर आधारलेली आहे : ( १ ) प्रत्येक मानवाची प्रवृत्ति मांगल्याकडेच आहे. ( २ ) जें खरोखर मंगल आहे, तें सर्वांनाच शुभ होय. एखादी गोष्ट मला चांगली पण त्याला वाईट असें असणें अशक्य आहे.



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# अहिंसा, लोकशाही व सत्याग्रह

सर्वसाधारण माणसाचें जीवन या श्रद्धांवर आधारलेलें नसतें. त्याचे सर्व व्यवहार नेमक्या उलटया तत्त्वावर चाललेले असतात. तो अशा वृत्तीनें वागतो कीं, जें त्यांस प्रेय, तेंच जणुं काय अंतिम श्रेय. शिवाय त्याची अशीहि समजूत असते कीं, त्याची एकट्याचीच प्रवृत्ति काय ती या श्रेयाच्या साधनेसाठीं असते.

त्याच्या या वृत्तीस आपण स्व-आग्रह असें नांव देऊं.सामान्य माणसाच्या जगाकडे पाहण्याचा दृष्टिकोन या स्व-आग्रहानें दूषित असतो. मला लठ्ठ पगाराची नोकरी मिळाली पाहिजे, माझें नांव सर्वतोमुखीं झालें पाहिजे, आगगाडींत बसावयास मला आराम-शीर जागा मिळाली पाहिजे, अशाप्रकारचा त्याचा एकसारखा आग्रह असतो. त्याला असें वाटतें कीं, या व अशाच प्रकारच्या आणखी अनेक गोष्टी झाल्या म्हणजे जीवन कृतार्थ होईल. त्याच्या असें लक्षांत येत नाहीं कीं, ज्याच्या संपादनानें जीवन कृतार्थ होणार आहे त्याच्या मांगल्याची खूण साऱ्यांनाच पटली पाहिजे. त्याची श्रद्धा अशी असत नाहीं कीं, जें खरोखर शुभ आहे, तें साऱ्यांनाच शुभद असणार. तो असें मानून चालत नाहीं कीं सारी मानवजात या परमकल्याणाच्याच शोधांत आहे. म्हणून तो स्व-आग्रही बनतो.

पण अहिंसावृत्तीच्या पायाभूत म्हणून ज्या दोन श्रद्धा वर सांगितल्या, त्या ज्याच्यांत दृढ झाल्या आहेत, त्याची वृत्ति स्व-आग्रही न बनतां सत्याग्रही बनते. 'अबाधित स्वरूप' असें सत्याचें लक्षण सांगतात. तेव्हां व्यक्तिगत असलेल्या भिन्नभिन्न स्व-आग्रही दृष्टीमुळें ज्याच्या मांगल्यास बाध येत नाहीं (म्हणजे जें सर्वांनाच मंगल असतें) त्यास 'सत्य' हें विशेषण लावल्यानें शब्दांचा वापर निरंकुशपणें केला असा आक्षेप येऊं नये. अहिंसकाचा आग्रह अशा प्रकारच्या सत्यासाठीं असतो.

एखादी गोष्ट मला ती तशी वाटते म्हणून शुभ अथवा मंगल असा आग्रह अहिंसक धरणार नाहीं, तर जें खरोखर मंगल असेल त्याच्यासाठीं त्याचा आग्रह असणार; सत्यासाठीं त्याचा आग्रह असणार. अर्थात् सत्य आपणांस गवसलें आहे असा त्याचा दावा नसतो, तो स्वतःस सत्याचा वाटसरू किंवा पुजारीच म्हणवतो. त्यामुळें सत्याविषयींच्या त्याच्या आग्रही वृत्तीपासून नम्रता ही अविभाज्य आहे.

सर्वसामान्य माणूस स्वतःस विश्वाचा मध्यबिन्दु समजतो, व विश्वानें आपल्याभोंवतीं फिरावें अशी अपेक्षा करतो. आपल्या छोट्याशा 'अहं'-मध्यें साऱ्या विश्वाचें मांगल्य सांठवलें आहे अशी त्याची कल्पना असते. पण स्वतःभोंवतीच गिरक्या घेणारे असे अनेक 'अहं' सत्याच्या परिसरांत वावरत असल्यानें त्यांची थडकाथडक होते व त्यांतून संघर्ष, कलह, व अशांति निर्माण होतात.

या उलट अहिंसक हा सत्यास मध्यबिंदु कल्पून त्याच्याभोंवतीं क्रमाक्रमानें लहान होणाऱ्या प्रदक्षिणा घालीत सत्याप्रत जाऊं इच्छितो. तो स्व–अभिमानी नसतो, तर सत्याभिमानी असतो. 'स्व'साठीं त्याचा आग्रह नसतो, तो सत्याग्रही असतो.

असे अनेक सत्याग्रही वीर असले, तरी त्यांच्यांत थडकाथडक होण्याचें कारण नाहीं. कारण ते सारे एकाच बिन्दूभोंवतीं, एकाच दिशेनें फेर धरीत असतात.

सत्याग्रहाची ही वृत्ति, लोकशाहीची ही वृत्ति अहिंसावृत्तीची केवळ निराळी बाजू आहे.

लोकशाही ही अहिंसेचें पार्थिव शरीर होय व सत्याग्रह हा त्याचा आचारधर्म होय.

---

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. नी. र. वऱ्हाडपाण्डे

# कला व नीति

कला व नीति यांचा संबंध काय यासंबंधीं मराठी साहित्यामध्यें अनेक दिवसांपासून चर्चा सुरू आहे, व आतां हा विषय बराच शिळा झाला असेंहि पुष्कळांना वाटण्याचा संभव आहे. असें असतां पुनः हाच विषय चर्चेसाठीं निवडण्याचें कारण असें कीं आजपर्यंत झालेली बहुतेक चर्चा या विषयावर स्पष्ट प्रकाश टाकण्यास असमर्थ आहे असें मला वाटतें. कलेवर बहुधा दोन बाजूंनीं हल्ले होतात. एक तर धर्ममार्तंड व नीतिब्रुव कलेला धर्माची व नीतीची बटिक करण्यास टपलेले असतात. कला म्हणजे धर्मापेक्षां व नीतीपेक्षां हीन असा एक व्यापार असून तिला सत्कारणीं लावण्यानें तिचा उद्धार होईल या भूमिकेवरून ते तिच्याकडे पाहतात. दुसरा वर्ग तथाकथित पुरोगामी लोकांचा. यांच्या मतें विशिष्ट तत्त्वांचा वा चळवळींचा पुरस्कार केल्याशिवाय कला उन्नत ठरूं शकत नाहीं. हरिनामाशिवाय कवित्व नाहीं असें ज्याप्रमाणें संतमंडळींचें घोषवाक्य होतें, त्याचप्रमाणें पुरोगामी प्रचाराशिवाय कलेला कलात्मत्व नाहीं असें या पक्षाचें मत आहे.

वस्तुतः नीति, धर्म, किंवा विशिष्ट तत्त्वप्रणाली यांचें जीवितांत काय स्थान आहे याचा नीट विचार केला तर हीं सर्व मतें, सूर्यकिरणासमोर धुकें ज्याप्रमाणें विरून जातें, त्याप्रमाणें ताबडतोब विरून जातात. आजकाल साहित्यिकांना आपण साहित्यिक आहोंत असें म्हणण्याची भारी लाज वाटते. माझें साहित्य अमुक एका चळवळीच्या परिपोषणासाठीं आहे, साहित्य हें एक माझ्या जीवनाचें उपांग आहे, असें स्वतःला व लोकांना सांगून हे साहित्यिक आत्मवंचना व परवंचना तर करीत आहेतच आणि शिवाय साहित्योपासना व कलोपासना या श्रेष्ठ व महान् कार्याची धुरा वाहण्याचें भाग्य लाभूनहि, आपलें कार्यक्षेत्र असावें तसें उच्च नाहीं असा नसताच ग्रह उराशीं बाळगून मानवी जीवनांतील एका महत्तम मूल्याचा अपमान करीत आहेत. नीति म्हणजे काय याचा स्पष्ट विचार केल्यास या म्हणण्याची सार्थता पटेल. कला व नीति यावर भाष्यें रचणाऱ्यांनीं आजपर्यंत या साध्या प्रश्नाचा विचार करण्याचें टाळलें व त्यामुळेंच या विषयावरील विचारांत सांवळागोंधळ माजला आहे.

## नीतीचा गुणधर्म 'औचित्य'

नीति म्हणजे सदाचरण अशी व्याख्या केल्यास 'नीति' या कल्पनेंतील प्राणभूत तत्त्व स्पष्ट होतें. एखादें आचरण चांगलें आहे असें आपण म्हणतों, उलट, दुसरें एखादें आचरण वाईट आहे असें आपण म्हणतों. रामशास्त्र्यांनीं 'तुम्हांला देहान्त प्रायश्चित्ताखेरीज दुसरें प्रायश्चित्त नाहीं' असें खुनी पेशव्याला बिनदिक्कत सांगितलें. हें वर्तन नीतिमत्तेचा उदात्त आदर्श म्हणून आपण समजतों. उलट सूर्याजी पिसाळ औरंगजेबाला फितुर झाला व त्यानें स्वदेशाला परदास्यांत लोटण्याचें कारस्थान केलें, हें आपण अतिशय निंद्य व घोर कर्म समजतों. मोठमोठीं राजसिंहासनें पालथीं पाडण्याचें सामर्थ्य व लावण्यवती स्त्रियांना भुरळ पाडण्यासारखें सौंदर्यशाली पौरुष अंगीं असूनहि सीतेवर एकनिष्ठ प्रेम करून एकपत्नीव्रत आचरणारा राम हा सदाचरणाचा आदर्श वाटतो. उलट स्वतःच्या अनेक बायका असूनहि परस्त्रीवर नेहमीं डोळा ठेवणारा नानासाहेब पेशवा चारित्र्यहीन वाटतो. उदात्तता आणि निंद्यता,









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आदर्शशीलता व चाहित्र्यहीनता हे जे आचरणाचे पस्पपरविरोधी गुणधर्म आहेत त्यांचाच अधिक विचार केला असतां नीति म्हणजे काय या प्रश्नाचें उत्तर मिळतें.

फितुरीचें कृत्य निंद्य व न्यायासाठीं जीवाची देखील पर्वा न करणें हें कृत्य उदात्त असें आपण कां म्हणतों ? या प्रश्नाचें उत्तर देतांना आपल्याला ‘ औचित्य ’ या कल्पनेचा आधार घ्यावा लागतो. देशाच्या स्वातंत्र्याचा संग्राम पाहून आपली वृत्ति अभिमान, उत्साह, गहिंवर, त्वेष इत्यादि भावनांनीं थरारून जाते. या संग्रामाच्या यशावर आपल्या मनाच्या सर्व सुप्त वा जागृत शक्ती उत्कण्ठेनें केंद्रित झालेल्या असतात. या संग्रामाला मदत करणाऱ्या सर्व घटना आपल्या भावनांना उचित रूपानें भासत असतात. उलट त्याला मारक असणाऱ्या सर्व घटना चीड आणणाऱ्या व म्हणून अनुचित वाटत असतात. स्वातंत्र्य-वीरांची प्राणाहुति आपल्या स्वातंत्र्यविषयक उत्साहाला भरतें आणीत असते. उलट फितुराचें स्वार्थसाधन त्या उत्साहाचा भङ्ग करून आपल्याला एखाद्या हिडीस गोष्टीच्या दर्शनानें वाटणारा ‘निर्वेद’ व उद्वेग आणून देत असतें. न्यायासाठीं प्राणांची- देखील आहुति द्यावयास तयार झालेल्या राम- शास्त्र्याचें कृत्यहि याचप्रमाणें अन्यायाविषयीं आपल्याला वाटणाऱ्या भावनांना ‘ योग्य ’, ‘असेंच पाहिजे होतें ’, ‘ शाबास ’, वगैरे म्हणायला लावतें. ‘ योग्य ’, ‘असेंच पाहिजे होतें’, ‘ शाबास ’ वगैरे उपरिनिर्दिष्ट शब्दांनीं जें व्यक्त होतें त्यालाच ‘ औचित्य ’ असें म्हणतात. नीतियुक्त आचरणा- मध्यें हा ‘ औचित्य ’ नांवाचा गुणधर्म असतो.

प्राणाहुतीची आवश्यकता असणाऱ्या लोकोत्तर नैतिक आचरणांतच केवळ औचित्य हा गुणधर्म असतो असें नाहीं, तर रोजच्या व्यवहारांत ज्या नीति- युक्त आचरणाची–सदाचरणाची—अपेक्षा असते त्यांत देखील ‘ औचित्य ’ हा अपरिहार्य गुणधर्म असतो. एखाद्यानें आपल्याला प्रेमानें ‘ या, बसा! ’ म्हटलें तर त्याबद्दल त्याला धन्यवाद देऊन त्याचें ... यांत “ औचित्य ” आहे.

असें उत्तर देणें अनुचित आहे. आपला मित्र परीक्षेंत नापास झाला तर त्याला चार समजुतीच्या गोष्टी सांगणें हें औचित्य आहे. उलट ‘ किती छान झालं, तूं नापास झालास ’ असें म्हणून त्या- बद्दल उलट आनन्दच प्रकटविणें अनुचित आहे. टेबलावर जेवायला बसलें असतां, इतर लोकांना- देखील जेवायचें आहे, हें लक्षांत ठेवून, बेतानें समोर ठेवलेल्या पदार्थांचा समाचार घेणें हें औचित्य आहे. उलट सर्व पदार्थांवर स्वतःच ताव मारून मिटक्या मारणें, व दुसऱ्यांना आपल्या तोंडाकडेच पाहत राहायला लावणें अनुचित आहे.

सर्वच सदाचरणाचा याप्रमाणें औचित्य हा गुणधर्म आहे, इतकेंच नव्हे तर अधिक विचार केला असतां औचित्याची व्याप्ति केवळ आचरणा- पुरतीच मर्यादित नाहीं असें दिसून येतें. साधे कपडे घालतांना अमुक रंगाच्या कोटाला, अमुक रंगाची पाटलूण चांगली दिसते असें आपण म्हणतों यांत देखील औचित्य हीच मूलभूत कल्पना आहे. तो रङ्ग या रङ्गाला जुळतो, म्हणजेच तो याला अनुरूप आहे, म्हणजेच हा त्याला उचित आहे असा अर्थ होतो. रङ्गसङ्गति म्हणजे रङ्गांच्या परस्पर सम्बन्धां- तील औचित्य. रङ्गसङ्गतीच्याहि पुढचें उदाहरण द्यायचें म्हणजे सङ्गीतांतील सुरांचें घेतां येईल. या सुराशींच तो सूर जुळतो; दुसरा एखादा घेतल्यास तो बेसूर होतो. सुरांचें हें जें संवादित्व आहे तें तरी आपल्या निरनिराळ्या घटकावयवांत असणाऱ्या ‘ औचित्य ’ नांवाच्या सम्बन्धाचेंच उदाहरण नाहीं काय ? दोन ध्वनिविशेष हे एका ध्वनीचेच प्रकार आहेत म्हणूनच केवळ त्यांच्यांत हा संबंध राहूं शकतो असें नाहीं. ध्वनि व हालचाल या दोहोंत देखील हा संबंध राहूं शकतो. नर्तकीचे पदविन्यास सङ्गीताच्या तालाप्रमाणें होत असतां ज्या सङ्गीता- बरहुकूम नृत्य होत असतें त्या सङ्गीतांत व त्या नृत्यांत मेळ असतो; सङ्गति असते तीं दोन्ही परस्प- रांना अनुरूप, उचित असतात.

‘ अपेक्षापूर्ति ’

या अनुरूप वा उचित असण्याचें कारण स्पष्ट

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अपेक्षा म्हणजे पुढें होणाऱ्या व्यापारांची पूर्वतयारी, त्यांच्यासाठीं होणारी मनाची सज्जता. शर्यतींत धांवण्यासाठीं सिद्ध असलेले खेळाडू एका विशिष्ट पवित्र्यांत उभे असतात व त्यांच्या सर्व चित्‌वृत्ती 'सुरू' असें उद्‌घोषित करणाऱ्या पंचाच्या संकेताकडे उन्मुख झालेल्या असतात. प्रतिपक्षी बॅट्स्‌मनचा अन्तराळांत उडालेला चेंडू झेलण्यास सरसावणारा क्रिकेटपटु एका विशिष्ट पवित्र्यांत उभा राहतो. हीं दोन्ही या सज्जतेच्या स्थितीचींच उदाहरणें आहेत. याच सज्जतेच्या स्थितीला इंग्रजींत Set असें म्हणतात.[१] पुढें कराव्या लागणाऱ्या व्यापारांची पूर्वतयारी त्या व्यापारांबद्दल आगाऊ जाणीव वा अपेक्षा असल्याशिवाय होऊं शकत नाहीं. अपेक्षेप्रमाणेंच पुढची परिस्थिति निर्माण झाली व तिला प्रतिक्रिया करण्यासाठीं ज्या प्रकारचे व्यापार नियोजून मन सज्ज झालें होतें, त्याचप्रकारचे व्यापार योजावे लागले, म्हणजे परिस्थिति व तिला केलेली प्रतिक्रिया या एकमेकांना अनुरूप ठरतात. पंचानें 'धांवा' म्हणण्याच्या क्षणभर आधींहि नाहीं वा क्षणभर नंतरहि नाहीं अशा रीतीनें धांवायला सुरुवात करतां आली म्हणजे धांवण्यासाठीं केलेली सज्जता व प्रत्यक्ष धांवण्याचा व्यापार हे एकमेकांना अनुरूप आहेत असें म्हणतां येतें. त्याचप्रमाणें चेंडू नेमका हातांत पडेल व झेलला जाईल अशा रीतीनेंच जर क्रिकेटपटूनें, तो आकाशांत उडाल्याबरोबर आपली हालचाल करून, पवित्रा घेतला, तरच त्याची ही सज्जता पुढच्या अपेक्षित व्यापाराला अनुरूप आहे असें म्हणतां येईल. उलट पंचानें 'सुरू' म्हटल्यावर दहा मिनिटांनीं धांवणारा शर्यतबाज व चेंडू भुईवर पडल्यावर आकाशाकडे पाहून हात पसरणारा क्रिकेटपटु, या दोघांचीहि सज्जता व आगामी व्यापारांबद्दलच्या त्यांच्या अपेक्षा, त्या व्यापारांना अनुरूप नसतात हें स्पष्ट आहे. अर्थात् प्रतिक्रियेची पूर्वतयारी व प्रत्यक्ष प्रतिक्रिया या जर एकमेकांना अनुरूप असतील तरच त्यांच्यात औचित्य हा संबंध असतो.

नर्तकीचे पदविन्यास व सङ्गीत यांच्यांत आपल्याला परस्परानुरूपता भासते याचें कारण देखील या अपेक्षेंत सापडतें. विशिष्ट प्रकारचा ताल आपल्या कानांवर पडला म्हणजे तो ताल ऐकावयाचा जो व्यापार आपलें मन करतें तो व्यापार देखील तालबद्धच असतो. ताल हा स्वभावतःच नियमबद्ध असल्यामुळें त्या तालाच्या नियमाप्रमाणेंच पुढें येणाऱ्या तालबद्ध ध्वनीची व नर्तकीच्या पदविन्यासाची आपलें मन 'अपेक्षा' करतें व त्याच्या स्वागतासाठीं सज्ज होतें. आपआपल्या अपेक्षेबरहुकूमच तालबद्ध ध्वनि आपल्याला ऐकायला मिळाला व तालबद्ध पदविन्यास पाहायला मिळाला म्हणजे अपेक्षा व अपेक्षित घटना यांच्यांतील अनुरूपतेचा आपल्याला अनुभव येतो. हा अनुरूपतेचा अनुभव म्हणजेच नृत्य व सङ्गीत या दोहोंतील 'औचित्य' नांवाच्या संबंधाचें दर्शन.

आतांपर्यंतची 'औचित्यविचारचर्चा' करतांना आपण कुठून कुठें आलों याचा विचार केल्याबरोबर कला व नीति यांचा संबंध काय हें एकदम स्पष्ट होईल. नीतिमय आचरण किंवा सदाचरण यामध्यें औचित्य नांवाचा प्राणभूत गुणधर्म असतो असें आपण आधीं पाहिलें. नीतियुक्त आचरण, तें ज्या परिस्थितींत घडलें तिच्याशीं अनुरूप असतें; तिला उचित असतें. पण पुढें या औचित्याची व्याप्ति नीतीपुरतीच मर्यादित नसून नृत्य, सङ्गीत, व क्रीडा इत्यादि व्यापारांतला देखील तो एक प्राणभूत गुणधर्म आहे हें आपल्याला दिसून आलें. पण नृत्य, सङ्गीत व क्रीडा हे कलात्मक व्यापार आहेत. अर्थात् नीतिव्यापार व कलाव्यापार या दोहोंमध्येंहि जो महत्त्वाचा व अपरिहार्य गुणधर्म आहे तो एकच आहे हें सिद्ध होतें. औचित्ययुक्त व्यापारांनीं आचरण नीतिमान् बनतें व औचित्ययुक्त व्यापारांनींच क्रीडा कलात्मक बनतात. अर्थात् कला व नीति यांत विरोध असणें शक्य नाहीं.

---

१ Set सम्बन्धीं अधिक विवेचन Psychology : A Study of Mental Life या वूडवर्थ-(Woodworth) च्या पुस्तकांत सांपडेल.









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## विषयवासना अनीतिमान् कशी ?

हा सिद्धान्त ऐकून बरेच नीतिपण्डित उद्गारतील : " प्रत्यक्ष सत्याशीं संबंध न ठेवतां केवळ अनुभवरहित ( a priori ) तर्काच्या आधारें असा सिद्धान्त ठोकून देणें सोपें आहे. केवळ तर्काच्या आधारें, कोणतीहि वस्तु एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाऊंच शकत नाहीं, असें देखील झीनो ( Zeno ) नांवाच्या ग्रीक तत्त्वज्ञानें सिद्ध केलें आहे; पण तो देखील रोज इकडे तिकडे फिरत असेलच कीं नाहीं ? केवळ तर्काच्या आधारें काल मिथ्या आहे असें प्रतिपादणारे तत्त्वज्ञ देखील घड्याळाबरहुकूम, गाडीची वेळ झाली म्हणून स्टेशनावर धांवतातच कीं नाहीं ! याप्रमाणें प्रत्यक्ष अनुभवानें एखादा युक्तिवाद खोटा ठरत असेल, तर तो तर्करूप नसून तर्कटरूप आहे असें कां म्हणूं नये ? एखादी कला अनीतिमय विचारांना चालना व प्रोत्साहन देते असें जर आपण प्रत्यक्ष पाहतों, तर केवळ युक्तिवादाच्या आधारें कला व नीति यांत विरोध असण्याचा संभव नाहीं असें म्हणण्यांत काय अर्थ आहे ? कालिदासाच्या कुमारसंभवांतील आठवा सर्ग शिवपार्वतींच्या संभोगाचें वर्णन करतो. हें संभोगवर्णन वाचून वाचकाच्या विषयवासना जागृत होऊन तो बिघडण्याचा संभव नाहीं काय ? 'काव्यप्रकाशां'त व्यभिचारी स्त्री-पुरुषांच्या प्रेमाची वर्णनें उदाहरणादाखल घेतलीं आहेत. व्यभिचार वर्णिणारीं काव्यें देखील अनीतिमान् नाहींत असें म्हणावयाचें असेल तर नीति या शब्दाचा अर्थ तरी काय ? टॉलस्टॉयची ' ॲना कॅरेनिना ' ही एका व्यभिचारिणीची कथा आहे. व्यभिचारिणीला नायिका कल्पिणारी कथा जर अनीतिमान् नव्हे, तर अनीतिमान् आहे तरी काय ? "

हा आक्षेप अगदीं सयुक्तिक आहे, पण त्याला उत्तर देणें कठिण नाहीं. प्रथम कालिदासकृत सम्भोगवर्णनाचें उदाहरण घेऊं. शिवपार्वतींच्या सम्भोगाचें वर्णन वाचून वाचकाची विषयवासना ... कबूल करण्यास अनीतिमान् ठरली असती. ( अर्थात् विषयवासनेला अनीतिमय व विवाहाला अनिवार्य ' पाप ' समजणारे देखील बहादूर आहेतच ! पण त्यांच्या नीतिकल्पनांचा विचार इथें कर्तव्य नाहीं. ) विषयवासनेची पूर्ति अनीतिमय मार्गांनीं करणें शक्य आहे. पण कुमारसम्भवाचा आठवा सर्ग वाचून अनीतिमय मार्गांनीं विषयवासनेची पूर्ति करायची इच्छा होईल याला प्रमाण काय ? ' ज्याची विषयवासना चाळवली गेली तो योग्य मार्गाच्या अभावीं व्यभिचारास देखील प्रवृत्त होण्याचा सम्भव आहे, त्यामुळें विषयवासना चाळविणारें वाङ्मय अनीतीस प्रोत्साहक असतें ' असें म्हणणें म्हणजे वीररसपूर्ण पोवाडे ऐकून ज्याची वीरवृत्ति उचंबळून आली आहे तो योग्य शत्रूच्या अभावीं भलत्यावरच शौर्य गाजविण्याचा सम्भव आहे असें म्हणण्यासारखें आहे. खाडिलकरांचे पोवाडे ऐकून परतणारे लोक, रणमैदानाच्या अभावीं, येत्या-जात्या वाटसरूवर चाल करून मारामारी करतात, वा घरीं गेल्यावर आपल्या बायकोवर शौर्य गाजवतात असें कधीं घडलें आहे काय ? त्याचप्रमाणें कालिदासकृत सम्भोगवर्णन वाचून कुणी व्यभिचारास प्रवृत्त झाल्याचें एक तरी उदाहरण आहे काय ? यासारख्याच एका प्रश्नाचा अभ्यास इंग्रज मानसशास्त्रज्ञ डॉ. सिरिल बर्ट ( Cyril Burt ) यानें आपल्या ' बालगुन्हेगार ' ( The Young Delinquent ) या पुस्तकांत, प्रत्यक्ष उदाहरणांचें अवलोकन करून केला आहे. या पुस्तकांत तो म्हणतो कीं, चोर-दरवडेखोर ज्याचे नायक आहेत असे सिनेमे पाहिल्यामुळें मुलें चोऱ्या करण्यास प्रवृत्त होतात कीं काय हें मी शोधून काढण्याचा प्रयत्न करतां, असले सिनेमे पाहिल्यामुळें चोरी करण्याची इच्छा झाल्याचें उदाहरण आढळलें नाहीं. अन्य कारणांनीं चोरी करण्याची इच्छा झाल्यावर, सिनेमांतले चोर ज्या मार्गाचा अवलम्ब करून चोरी करतात, त्याच मार्गाचा अवलम्ब करण्याची प्रवृत्ति मात्र कांहीं बालगुन्हेगारांत आढळली. ही प्रवृत्ति आढळते याचा देखील अर्थ




अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

युक्तिवाद करण्यासारखें आहे. ' अ ' नें ' ब ' ला एक दोरी विकली व त्या दोरीच्या साहाय्यानें ' ब ' नें ' क ' ला गळफांस लावून त्याचा प्राण घेतला, तर त्या खुनाची जबाबदारी दोरी विकणाऱ्या ' अ '-वर टाकण्यासारखेंच हें समंजसपणानें आहे ! एखाद्या माणसाच्या हाताला पक्षाघाताचा विकार झाला असतां डॉक्टरानें तो बरा केला व त्यानन्तर त्यानें त्या हाताचा उपयोग पापकर्मासाठीं केला तर त्या पापकर्माची जबाबदारी त्या डॉक्टरावर येईल काय ? 'येईल' असें जर त्याचें उत्तर असेल तर तितपत जबाबदारी कलेवरहि अनीतिप्रवर्तनाच्या बाबतींत येते असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण तितपतच ! त्याहून रतिभरहि जास्त नाहीं.

याचें कारण असें आहे कीं, कला जरी कधींकधीं अनीतिमय आचरणाचें चित्रण करीत असली तरी त्या आचरणांतील अनीतिमत्ता शक्य तेवढी बाजूला व अन्धारांत ठेवून त्यांतील आकर्षक औचित्यपूर्ण व सौन्दर्यपूर्ण भागांनाच तेवढा उठाव देते. या विधानाचा विचार करतांना कुमारसम्भवांतील आठव्या सर्गाचा विचार थोडा वेळ बाजूला ठेवून काव्यप्रकाशांतील व्यभिचारवर्णनांचा विचार करूं. कारण कुमारसम्भवाच्या आठव्या सर्गांतील वर्णन पतिपत्नींच्या सम्भोगाचें असल्यामुळें त्यांत नीति-अनीतीपेक्षां, श्लीलाश्लील विचाराचाच संबन्ध जास्त येतो.

## अनुचित घटनांच्या विरोधानें सौन्दर्याला उठाव

दुसऱ्या स्त्रीशीं रतिक्रीडा करून एक नायक आपल्या पहिल्या प्रेयसीकडे येतो. तिच्या उरोजावरील चन्दनराग व पत्ररचनेचा रङ्ग तिला गाढालिङ्गन दिल्यामुळें त्याच्याहि वक्षःस्थलावर लागलेला असतो. परस्त्री-उपभोगाची हीं चिन्हें अङ्गावर असून देखील तो घाईनें पहिल्या प्रेयसीकडे आला खरा, पण आल्यावर मात्र तीं चिन्हें तिच्या सहज लक्षांत येतील न ती रागावेल आणि आपलें प्रियाराधन व्यर्थ होईल अशी त्याला भीति वाटूं लागली. तेव्हां हीं चिन्हें तर दिसूं नयेत व शिवाय तिची मनधरणीहि करतां यावी म्हणून त्यानें एक युक्ति योजिली. आल्याबरोबर तिच्या पायाचें चुम्बन घेण्यासाठीं तो वांकला. त्याला वाटलें कीं, खालीं वांकल्यामुळें आपल्या छातीवर असलेलीं उपभोगचिन्हें तिला दिसणार नाहींत व ' पायावर लोटाङ्गण घालण्याइतका, आपल्या प्रेमामुळें, आपला प्रियकर लाचार झाला आहे, असें तिला वाटून तिचें कोमल हृदय एकदम प्रणयभरानें उचम्बळून येईल. पण तीहि कांहीं अगदींच मुग्धा नव्हती; शिवाय सवतीमत्सर हा कोणत्याहि स्त्रीला अगदीं उपजतच असतो. ती एकदम रागानें म्हणाली, ' कळलं बरं मला ! पायाचं चुम्बन घेण्याचा कपटीपणा करून दुसऱ्या स्त्रीशीं केलेल्या क्रीडेच्या खुणा लपविण्याचा प्रयत्न चालला आहे. पुरे करा माझ्याविषयींच्या प्रेमाचं हें नाटक ...... ' डाव कांहीं साधला नाहीं हें त्या नायकाच्या लक्षांत आलें. पण तो पक्का बिलन्दर होता. समयज्ञतेनें तो म्हणाला : ' कां, कुठें आहेत त्या खुणा ? ' व एकदम त्यानें तिला आलिङ्गन दिलें; आणि तिच्या उरोजावर आपलें वक्षःस्थळ घासून त्या खुणा पुसून टाकल्या : अचानक झालेल्या या हल्ल्यामुळें ती गांगरली व त्या गाढ आलिङ्गनाच्या नि अङ्गघर्षणाच्या सुखामुळें रुसून बसण्याचा तिचा निश्चय पार ढांसळला.[२]

या श्लोकांत एका व्यभिचारी पुरुषाच्या प्रियाराधनचातुर्याचें वर्णन आहे. पण या श्लोकांत सौंदर्य आहे असें सहृदय रसिकांना वाटतें तें कां ? त्यांतील व्यभिचाराच्या वर्णनामुळें कीं प्रियाराधनचातुर्याच्या वर्णनामुळें ? व्यभिचार ही केवळ या श्लोकांतील

---

२ हें उदाहरण ' काव्यप्रकाश'कारानें ' अमरुशतकां 'तून घेत लें आहे. मूळ श्लोक असा आहे :

" तस्याः सान्द्रविलेपनस्तनतटप्रश्लेषमुद्राङ्कितं
किं वक्षश्चरणानतिव्यतिकरव्याजेन गोपाय्यते ।
इत्युक्ते क्व तदित्युदीर्य सहसा तत्सम्प्रमार्ष्टुं मया
साश्लिष्टा रभसेन तत्सुखवशात्तन्व्या च तद्विस्मृतम् ॥ "









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वर्णनाची पार्श्वभूमि आहे. प्रियकराच्या व्यभिचारामुळें रागावलेल्या स्त्रीची आराधना करणें जास्त कठिण असतें. हें कठिण काम साधण्यांतील चातुरी हेंच कवीचें मुख्य प्रतिपाद्य आहे. चित्रकार ज्याप्रमाणें मुख्य चित्राला उठाव देण्यासाठीं पार्श्वभूमि म्हणून काळ्या गडद रंगाचा देखील उपयोग करतो, त्याचप्रमाणें प्रियाराधन या मुख्य प्रतिपाद्याला उठाव देण्यासाठीं व्यभिचाराच्या काळ्याकुट्ट पार्श्वभूमीचा कवीनें प्रयोग केला आहे. व्यभिचार हें औचित्यपूर्ण आचरण नाहीं. अर्थात् ती सौंदर्यपूर्ण घटना नाहीं. पण तिचा उपयोग मात्र सौंदर्यपूर्ण घटनेच्या सौंदर्यांत भर टाकण्यासाठीं करतां येतो. मीठ हें स्वतः चविष्ट नसतें. पण इतर पदार्थांना चव आणण्यासाठीं त्याचा फार चांगला उपयोग करतां येतो. अनीतिपूर्ण घटना कलाकृतींत येतात त्या मिठाप्रमाणेंच प्रतिपाद्य सौंदर्याची गोडी वा चवदारपणा वाढवण्यासाठींच येत असतात. प्रियाराधन ही एक सौंदर्यपूर्ण घटना आहे. तिचें सौंदर्य खुलविण्यासाठीं व्यभिचारासारख्या असुंदर व अनुचित घटनेचा उपयोग करतां येतो.

'ॲना कॅरेनिना' या कादंबरींत सौंदर्य आहे तें देखील ज्या घटना स्वतः सौंदर्यपूर्ण आहेत त्यांना व्यभिचाराची पार्श्वभूमि दिल्यामुळेंच आलें आहे. पतिप्रेमानें मनाची भूक पूर्णपणें न शमल्यामुळें या कादंबरीची नायिका व्यभिचारास प्रवृत्त होते. आपला पति आपल्याला स्वतंत्र जीवन व व्यक्तित्व आहे हें विसरून आपल्याशीं वागतो, आपण केवळ त्याचें वैभव वाढविणाऱ्या त्याच्या मालमत्तेचाच एक भाग आहोंत असें त्याला वाटतें, या जाणिवेनें ॲनाचें मन अतृप्त व भुकेलें राहतें. आपल्या व्यक्तित्वाशीं समरस होऊन आपल्यावर प्रेम करणारा पुरुष आपल्याला मिळावा असें तिला वाटत असतें. तसा तो मिळाला असें वाटल्यामुळेंच ती व्यभिचाराला प्रवृत्त होते. 'आज भुकेल्याला अन्न मिळालें' अशीच व्यभिचार करतांना तिची भावना असते. स्वतःच्या व्यक्तित्वाचा परिपोष करणारें प्रेम करणारें प्रेम शिष्टसंमत अशा वैवाहिक जीवनांतच जर ॲनाला मिळूं शकलें असतें, तर तिच्या प्रेमकहाणींत अनीतीचा संबंध आला नसता. पण ॲनाची प्रेमकहाणी जी जास्त हृदयवेधी वाटते ती तिला आपल्या खऱ्या प्रेमाची भूक भागविण्यासाठीं व्यभिचाराचा मार्ग पत्करावा लागतो म्हणून. व्यभिचार निंद्य असल्यामुळेंच तिच्या प्रेमाच्या भुकेची उत्कटता जास्त जाणवते. रावणाचें सामर्थ्य जेवढें अधिक दाखविलें जाईल तेवढाच रामाच्या पराक्रमाला उजाळा येतो. धोका जेवढा अधिक मोठा तेवढेंच तो पत्करणाऱ्याचें धैर्य मोठें वाटतें. विद्यार्थी जेवढा मठ्ठ तेवढाच त्याला शिकवून विद्वान् करून देणाऱ्या गुरूची करामत मोठी वाटते. रोग जेवढा असाध्य व प्राणघातक तेवढें तो बरा करून देणाऱ्या डॉक्टरचें चातुर्य जास्त. या उदाहरणांत ज्याप्रमाणें रावणासारख्या खलपुरुषाचें सामर्थ्य, धैर्यवंतानें पत्करलेला धोका, विद्यार्थ्यांचा मठ्ठपणा व रोग्याची असाध्यता, हीं अनुक्रमें रामाचा पराक्रम, धैर्यवंताचें धैर्य, गुरूचें कौशल्य, व डॉक्टरचें औषधज्ञान, यांना अधिक उठाव देणाऱ्या पार्श्वभूमीचें काम करतात, त्याचप्रमाणें ॲना कॅरेनिना या कादंबरींत नायिकेनें केलेला व्यभिचार आन्तरिक प्रेमाची भूक व तींतून उद्‌भवलेलें जीवनचरित या मूलतः सौंदर्यमय असलेल्या गोष्टीची उत्कटता व परिणामकारकता वाढविण्यासच मदत करतो. मुळांत असुंदर व अनीतिमान् असलेली घटना देखील सुंदर व नीतिमान् घटनेचें सौंदर्य वाढवूं शकते ती याप्रमाणें.

कलाकृतीमध्यें येणारें अनीतिमय आचरणाचें वर्णन सौन्दर्यपरिपोषाला मदत म्हणूनच येत असतें हें आतांपर्यंतच्या विवेचनावरून स्पष्ट होतें. अर्थात् अनीतीचें वर्णन करणारी कलाकृतिदेखील, सौन्दर्याचें दर्शन करून देत असल्यामुळें अनीतिप्रवर्तक असते असें म्हणतां येत नाहीं.

### सुख हें स्वयमेव साध्य

सौन्दर्यपरिपोष हा कलेचा आत्मा असल्यामुळें कला अनीतिप्रवर्तक असूं शकत नाहीं. कलाकृतींत

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

र महत्त्वाच्या मुद्द्यावर आपण येऊन पोचतों. नीतिविरोधी कला ' हा वा असल्या तऱ्हेचा शब्दप्रयोग वापरणारे लोक, नीति म्हणजे काय या प्रश्नाचा फारसा विचार कधीं करीत नाहींत. 'औचित्य ' हा नीति व कलाकृति या दोघांतलाहि कारणभूत व अटळ गुणधर्म आहे हें मागें दाखवून दिलेंच आहे. यापेक्षांहि जरा सखोल रीतीनें नीतीचा विचार केला म्हणजे नीति व कला यांतील सम्बन्ध जास्त स्पष्ट होतो. नीति म्हणजे चांगलें आचरण. पण अमुक आचरण चांगलें व अमुक वाईट असें आपण कां म्हणतों ? रोज नियमित व्यायाम घेणें चांगलें, उलट रोज नियमितपणें अफू खाणें वाईट असें कां ? तर व्यायाम केल्यानें प्रकृति निरोगी राहते, शरीरबल वाढतें व आयुष्य लाभतें; उलट अफू खाण्यानें प्रकृति बिघडते, शरीर निर्बल होतें व आयुष्य कमी होतें असें उत्तर देतां येईल. पण शरीर निरोगी राहिल्यानें काय साधतें व रोगी झाल्यानें काय बिघडतें असें कुणी म्हटलें तर ? शरीर निरोगी राहिल्यानें सुख वाढतें व रोगी राहिल्यानें दुःख होतें असें त्याचें समाधान करतां येईल. पण यावरहि सुख वाढल्यानें काय साधतें व दुःख झाल्यानें काय बिघडतें असें कोणीं विचारलें तर कांहीं उत्तर देतां येईल काय ? सुख वाढल्यानें दुसरें कांहीं साधत नसून ' सुख ' साधतें व दुःख झाल्यानें दुसरें कांहीं बिघडत नसून दुःख होतें या पलीकडे या प्रश्नाचें उत्तर देतां येत नाहीं. ' सुख ' ही स्वयमेवच साधण्यासारखी वस्तु आहे उलट ' दुःख ' ही स्वभावतःच त्याज्य वस्तु आहे म्हणून सुखसंवर्धन चांगलें व दुःखसम्पादन वाईट. ' सुख ' ही स्वयमेवच साधण्यासारखी वस्तु आहे म्हणजे तिचा चांगुलपणा स्वयंसिद्ध आहे. उलट दुःख ही स्वयमेवच त्याज्य वस्तु आहे म्हणजे तिचा वाईटपणा स्वयंसिद्ध आहे. कोणतेंहि आचरण चांगलें अगर वाईट कां याचें उत्तर देतांना आपल्याला शेवटीं या स्वयंसिद्ध चांगल्या व स्वयंसिद्ध वाईट अशा वस्तूंचा आधार घ्यावा लागतो. ' क्ष ' आचरण चांगलें, कारण त्याचे जे परिणाम होतात त्यांत ' सुख 'सारख्या स्वयंसिद्ध चांगल्या अशा परिणामांचा समावेश होतो; उलट ' ब ' आचरण वाईट, कारण त्याच्या परिणामांत ' दुःखा 'सारख्या स्वयंसिद्ध वाईट अशा परिणामांचा समावेश होतो. अशी चांगल्या व वाईट आचरणांची व्याख्या देता येते.

' सुखासारख्या स्वयंसिद्ध चांगल्या गोष्टी ' या शब्दप्रयोगवारून सुखाव्यतिरिक्त आणखीहि कांहीं गोष्टी अशा आहेत कीं, ज्यांचा चांगुलपणा स्वयंसिद्ध आहे असें सूचित होतें, व तेंच इथें अभिप्रेत आहे. आचरण चांगलें कीं वाईट हें ठरवितांना ज्याप्रमाणें त्याचा परिणाम सुखमय आहे कीं दुःखमय आहे हें विचारांत घ्यावें लागतें, त्याचप्रमाणें त्या आचरणानें ' सौन्दर्य ', ' ज्ञान ' इत्यादींचा परिपोष होतो कीं नाहीं हेंहि विचारांत घ्यावें लागतें. 'सुख' चांगलें कां, या प्रश्नाचें ज्याप्रमाणें उत्तर देतां येत नाहीं त्याचप्रमाणें ' सौन्दर्य ' चांगलें कां, वा ज्ञान चांगलें कां, याहि प्रश्नांचीं उत्तरें देणें कठीण जाईल. ' सौन्दर्य ' व ' ज्ञान ' हीं चांगलीं आहेत कारण त्यांच्यामुळें आनन्द होतो असें कुणी यावर म्हणण्याचा सम्भव आहे व हें म्हणणें बरेंच सयुक्तिकहि आहे. ' सौन्दर्य ' व ' ज्ञान ' यांचा चांगुलपणा जर त्यांच्या सुखमयत्वावर अवलम्बून असेल तर ' सौन्दर्य ' व ' ज्ञान ' यांचा चांगुलपणा सुखापासून सिद्ध झाला आहे, म्हणून तो स्वयंसिद्ध नाहीं असें म्हणावें लागेल. ' सौन्दर्य ' व ' ज्ञान ' यांचा चांगुलपणा स्वयंसिद्ध असो वा नसो, पण चांगुलपणा हा त्यांचा अढळ गुणधर्म आहे यांत मात्र कांहीं शंका नाहीं. अर्थात् ज्या आचरणाचे परिणाम सुखमय आहेत तें चांगलें असें ज्याप्रमाणें आपण म्हणतों त्याचप्रमाणें ज्या आचरणाचे परिणाम सौन्दर्यमय व ज्ञानमय आहेत तें आचरण चांगलें म्हणजे नीतियुक्त असें म्हणावें लागतें. सौन्दर्याचा आस्वाद, सौन्दर्याची निर्मिति, आणि सौन्दर्य-निर्मितीला व सौंदर्यास्वादाला परिपोषक असे अनुभव घेणें या सर्व क्रिया नीतिमान् आहेत असाच यांतून सिद्धान्त निघतो.

### नीतीपेक्षां सौन्दर्य उच्च

आतां सौन्दर्यनिर्मिति व सौन्दर्यास्वाद याशिवाय कलेचें तरी नियतकार्य दुसरें कोणतें आहे ? सौन्दर्या-

[ पुढील मजकूर पान ४९ वर पहा ]



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

प्रा. म. अ. मेहेंदळे

# संस्कृत ही कधीं राष्ट्रभाषा होती काय ?

हिंदुस्थान देशाची राष्ट्रभाषा कोणती असावी ह्याबद्दलचा वाद येथें स्वातंत्र्य मिळण्यापूर्वीपासूनच सुरू झाला होता. अर्थात् ही एक आश्चर्य वाटण्याजोगी गोष्ट आहे कीं, ज्या देशाला सांस्कृतिक दृष्ट्या अविच्छिन्न अशी एकता दोन हजार वर्षांपेक्षां अधिक काल लाभण्याचें सौभाग्य लाभलें, त्याच देशांत या दीर्घकालांत एक राष्ट्रभाषा निर्माण होऊं नये आणि त्याविषयीं पुढें भिन्नभाषीयांत फूट पडण्याइतका वाद माजावा. ह्या वस्तुस्थितीचें एक कारण असें असूं शकेल कीं राष्ट्रभाषेची ही कल्पनाच येथें अगदीं नवीन असावी. अशी कल्पना ह्या देशांत पूर्वींच कां प्रसृत झाली नाहीं ह्या विषयींची कारण-परंपरा शोधण्याचा येथें उद्देश नाहीं. हिंदुस्थानचें विच्छेदन होऊन त्याचे दोन देश होण्यापूर्वी राष्ट्र-भाषेच्या वादाबरोबरच राष्ट्रलिपीसंबंधीचा वादहि धिंगाणा घालत होता. ह्या वादांत मुख्यत्वें दोन पक्ष होते. एका पक्षाचें म्हणणें संस्कृतनिष्ठ हिंदी ही राष्ट्र-भाषा व देवनागरी ही राष्ट्रलिपि असावी असें होतें; तर दुसऱ्या पक्षाचें म्हणणें पर्शिअन शब्दांचें प्राधान्य असलेली उर्दू ही राष्ट्रभाषा व लिपि असावी असें होतें. महात्मा गांधींच्या नेतृत्वाखालीं राजकीय लढा देणाऱ्या कॉंग्रेसनें ह्या दोन्ही पक्षांतील सुवर्णमध्य साधण्याचा प्रयत्न केला व जी संस्कृतनिष्ठहि नाहीं व फारसीनिष्ठहि नाहीं अशी हिंदुस्थानी ही देशाची ... ह्या

आला नाहीं. देशाच्या फाळणीनंतर साहजिकच हिंदी-उर्दू वादाला मूठमाती मिळाली व नव्यानें जन्माला आलेल्या भारतांत हिंदी-हिंदुस्थानी वाद तेवढा राहिला. आणि कांहीं दिवसांपूर्वीं घटना-परिषदेनें हिंदी ही राष्ट्रभाषा व देवनागरी ही राष्ट्र-लिपि असावी असा निर्णय प्रचंड बहुमतानें घेऊन, बरीच वर्षें चाललेला हा वाद अखेर मोठ्या मेहन-तीनें मिटविला.

## कांहीं पुढाऱ्यांचा आग्रह

परंतु हा वाद मिटण्यापूर्वीं हिंदी किंवा हिंदु-स्थानी ह्या भाषा व देवनागरी ही लिपि यांखेरीज दुसऱ्याहि कांहीं भाषा किंवा लिपी यासंबंधीच्या सूचना मधूनमधून करण्यांत येत होत्या आणि यातील कांहीं सूचना तर भारतीय मान्यता पावलेल्या विद्वानांकडून करण्यांत आल्या होत्या. उदाहरणार्थ, देवनागरीऐवजीं रोमन लिपीला राष्ट्रलिपीचें मानाचें स्थान द्यावें असें मत सुप्रसिद्ध भाषापंडित डॉ. सुनीतिकुमार चतर्जी यांनीं प्रतिपादिलें होतें. पण हें मत भारतीय लोकांच्या मनाची पकड घेऊं शकलें नाहीं. त्याचप्रमाणें इंग्लिश हीच राष्ट्रभाषा म्हणून कायम करण्यांत यावी असेंहि कित्येक विद्वानांचें मत होतें. तथापि इंग्रजीला आंतरराष्ट्रीयदृष्ट्या महत्त्व असल्यामुळें त्या भाषेचें ज्ञान भारतीयांस असणें इष्ट आहे असें सर्वसामान्य मत असलें तरी ह्या राष्ट्रांतील लोकांना ती भाषा अत्यंत परकी असल्या-... लोक ... भाषेचें स्थान ...

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

एक प्रकारची कृत्रिमता जीवनांत निर्माण करणें योग्य नव्हेंतेंच.

इंग्लिशखेरीज संस्कृत हीहि भारताची राष्ट्रभाषा असावी असें हिरीरीनें म्हणणारेहि कांहीं पुढारी होते. हें मत प्रतिपादणाऱ्यांत कित्येक जरी केवळ संस्कृत भाषेचें अध्ययन करणारे शास्त्री पंडित होते तरी त्यांच्यांत कांहीं राजकीय पुढारीहि सामील झाले होते. घटनापरिषदेपुढें राष्ट्रभाषेचा प्रश्न चर्चेस निघण्याच्या वेळेसच संस्कृत ही राजभाषा असावी असें नामदार डॉ. बाबासाहेब आंबेडकर व इतर कांहीं पुढारी यांनीं आग्रहानें सुचविलें होतें. संस्कृत हीच एक भाषा राष्ट्रभाषा होण्यास योग्य असल्याचें आपलें मत बंगालचे गव्हर्नर नामदार डॉ. कैलासनाथ काटजू यांनीं पूर्वीपासून मांडलें होतेंच आणि आतां राष्ट्रभाषेसंबंधींचा वाद घटनादृष्ट्या संपल्यावरसुद्धां पुन्हां, कलकत्त्यास भरलेल्या विद्वानांच्या परिषदेंत त्यांनीं राज्यकारभाराचा सर्वाधिकार जर त्याच्याकडे असता तर संस्कृत हीच राष्ट्रभाषा म्हणून कायम केली असती असें जोरदारपणें सांगितलें. संस्कृतला राष्ट्रभाषा म्हणून स्वीकारा असें म्हणणारे लोक आग्रहानें नेहमीं असें म्हणत असतात कीं आपल्या देशांत संस्कृत ही एकेकाळीं भारतीयांची बोलभाषा होती आणि म्हणून तिचा पुन्हां एकदां रोजच्या व्यवहारासाठीं उपयोग करण्यांत यावा. आजच्या परिस्थितींत प्रत्येक प्रांताची स्वतंत्र अशी बोलभाषा कैक शतकांपासून रूढ झाली असतांना व यांपैकीं बहुतेक सर्व भाषांतून समृद्ध असें साहित्य निर्माण झालें असतांना त्या सर्वांना बाजूस सारून संस्कृतला आज राष्ट्रभाषा करणें कितपत व्यवहार्य आहे हा महत्त्वाचा प्रश्न बाजूस ठेवला तरी, संस्कृत ही एकेकाळीं हिंदुस्थानची बोलभाषा होती ह्या म्हणण्यांतहि कितपत तथ्य आहे हें पाहणें उद्बोधक ठरेल.

## संस्कृत भाषेचीं तीन स्थित्यंतरें

अगदीं प्रथमच हें ध्यानांत ठेवायला हवें कीं आज जेव्हां आपण 'संस्कृत' 'संस्कृत' म्हणून म्हणतों तेव्हां त्या भाषेच्या विकासाच्या नेमक्या कोणत्या अवस्थेला उद्देशून आपण हा शब्द वापरीत असतों तें स्पष्ट करीत नाहीं. वेदकालापासून सुमारें गुप्तकालापर्यंत ह्या संस्कृत भाषेचीं कमींत कमी तीन तरी स्थित्यंतरें आपणांस आढळतात. तेव्हां नुसतें 'संस्कृत' असें म्हटल्यानें त्या शब्दांचा अर्थ कांहींसा संदिग्ध राहतो हें ओघानें आलेंच. खिस्त-शकापूर्वीं सुमारें दोन हजार वर्षांपूर्वीं केव्हां तरी आर्य लोकांच्या टोळ्या हिंदुस्थानांत आल्या तेव्हां त्यांच्यांत व्यवहारासाठीं एक भाषा किंवा कांहीं तुरळक फरक असलेल्या निरनिराळ्या बोली रूढ होत्या. ह्या भाषेची किंवा बोलींची कल्पना तत्कालीन वेदसंहितेवरून आपणांस स्पष्टपणें येते. आपणांस ठाऊक असलेल्या संस्कृतभाषेचें हें ऋग्वेदादि संहितांतून आढळणारें पहिलें स्वरूप. यानंतरचें म्हणजे दुसरें स्वरूप आपणांस ह्या संहितांच्या ब्राह्मण-भागांतून पहावयास मिळतें. ह्या दुसऱ्या अवस्थेंत संहिता-भागांत वारंवार आढळणारीं कित्येक रूपें नेहमींच्या उपयोगांतून दूर झालेलीं दिसतात. भाषेंतले हे जुने (आर्ष) प्रयोग काढून टाकून तिला एक सरळ स्वरूप देण्याचें काम यानंतरहि होत होतेंच आणि तें इसवी सनापूर्वीं सुमारें पांच शतकें होऊन गेलेल्या महापंडित पाणिनीच्या काळापर्यंत चालू राहिलें. पाणिनीच्या काळीं रोजच्या बोलींत असणाऱ्या संस्कृतांत व वैदिक संस्कृतांत इतका फेर पडला कीं, त्याला ह्या दोन अवस्थांचा निरनिराळा स्पष्ट उल्लेख करावा लागला. पाणिनीनें आपणांस अवगत असलेलें संस्कृत भाषेचें पहिलेंच संपूर्ण असें व्याकरण लिहिल्या-वरहि त्या भाषेंत कालपरत्वें व देशपरत्वें किरकोळ फेरबदल होत गेलेच. आणि त्या सर्वांचें संकलन पाणिनीच्या नंतर होऊन गेलेले वार्तिककार कात्यायन व महाभाष्यकार पतञ्जलि यांनीं करून ठेविलें. 'संस्कृत' म्हणून सर्वसाधारणपणें ओळखल्या जाणाऱ्या भाषेची ही तिसरी अवस्था होय. यानंतर मात्र ह्या भाषेंत भाषा ह्या दृष्टीनें फेरफार झाले नाहींत.

संस्कृत भाषेच्या विकासांत अशा प्रकारें तीन अवस्था असल्या तरी सोयीसाठीं आपणांस वेद-कालीन संस्कृत व पाणिनीचें 'भाषा' संस्कृत अशा दोन स्वरूपांतहि तिची कल्पना करतां येईल. ह्या दोन स्वरूपांत मात्र भाषेच्या दृष्टीनें इतका फरक आहे कीं भाषाशास्त्रज्ञांच्या मतें वेदकालीन संस्कृ-ताला उत्तरकालीन संस्कृतापेक्षां पारश्यांच्या अवेस्तां-



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## संस्कृत ही कधीं राष्ट्रभाषा होती काय ?

तील भाषा अधिक जवळची आहे. आणि असें असूनहि संस्कृतला राष्ट्रभाषा करण्याविषयीं जेव्हां आग्रहपूर्वक प्रतिपादन होतें तेव्हां ह्या दोन स्वरूपांपैकीं नेमक्या कोणत्या स्वरूपाला उद्देशून हा ' संस्कृत ' शब्द वापरला जात आहे तें स्पष्ट करण्यांत येत नाहीं. ह्या दोन स्वरूपांपैकीं आज जिच्याशीं कांहींजणांची तोंडओळख आहे ती म्हणजे रामायण-महाभारतासारख्या ग्रंथांत व कालिदासादिकांच्या अमर कृतीत आढळणारी उत्तरकालीन संस्कृत भाषा होय. आणि वर म्हटल्याप्रमाणें हें स्वरूप वेदांतील स्वरूपापेक्षां इतकें भिन्न आहे कीं ज्यानें केवळ संस्कृत काव्यांचा अभ्यास केला असेल त्याला वेदांतील एकाहि ऋचेचा अर्थ लागणें कठिण आणि वेदकालीन संस्कृताविषयीं बोलावयाचें म्हणजे त्याचें व्याकरण इतकें अवघड आहे कीं आज संस्कृतचें साधारण ज्ञान असणाऱ्यांनासुद्धां ह्या भाषेच्या त्या स्वरूपांत व्यवहार करणें दुर्घट आहे.

### प्राकृतांचा विकास

संस्कृत भाषेच्या ह्या भिन्न स्वरूपांविषयीं नीट विचार केला म्हणजे ' संस्कृत ही एकदां भारताची बोलभाषा होती ' ह्या वाक्याचा अर्थ किती मर्यादित स्वरूपांत स्वीकारतां येतो हें ध्यानांत येईल. प्रथमतः हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, ज्या कांहीं आर्यांच्या टोळ्या हिंदुस्थानांत प्रथम आल्या आणि कांहीं काल हिंदुस्थानच्या वायव्य व उत्तर विभागांत वास्तव्य करून राहिल्या, त्यांच्यांतच वेदांत आढळणाऱ्या संस्कृतासारखी एक भाषा रोजच्या व्यवहारासाठीं उपयोगांत होती. परंतु या टोळ्या येथें येण्यापूर्वींच ह्या देशांत वसति करून राहिलेल्या लक्षावधि लोकांच्या संख्येच्या मानानें ह्या संस्कृत भाषिकांची संख्या किती अल्प असणार ! आणि या आर्येतरांच्या, त्यांच्या दैनंदिन व्यवहारास पूर्णपणें उपयुक्त ठरलेल्या अशा भाषा होत्याच. ह्या आर्येतरांनीं मग जेव्हां जेत्यांची संस्कृत भाषा त्यांच्या व्यवहारांत आणण्याचा प्रयत्न केला तेव्हां त्यांच्यांतील कांहीं जणांना जरी ह्या प्रयत्नांत यश मिळालें तरी बहु

संस्कारांच्या लोकांचा असा संगम झाल्यामुळें आणि एखाद्या भाषेचा नैसर्गिक विकास ज्या विशिष्ट नियमांनुसार होतो त्यामुळेंहि ही वेदकालीन संस्कृत भाषा निरनिराळ्या प्राकृतांत परिणत झाली. ह्या निरनिराळ्या प्राकृतांचीं नांवें पाहिलीं म्हणजे ह्या भाषा कांहीं भौगोलिक मर्यादा किंवा भिन्न भिन्न व्यवसाय करणारे समुदाय यांच्यांत प्रथम रूढ झाल्या असाव्यात असें दिसतें. ह्यांपैकीं प्राकृताचीं महाराष्ट्री, मागधी, शौरसेनी यांसारखीं नांवें पाहतां दुसरी एक गोष्ट ठळकपणें ध्यानांत येते. ती अशी कीं ह्या ' प्राकृत ' अवस्थेंत सुद्धां ह्या आर्यभाषांचा प्रसार महाराष्ट्राच्या खालीं दक्षिणेंत झाला नव्हता. याच निरनिराळ्या प्राकृतांना पुढें अपभ्रंश स्वरूप मिळालें आणि ह्या अपभ्रंशापासून उत्तर हिंदुस्थानांतील प्रांतिक बोलभाषांचा जन्म झालेला आहे. वेदकालीन संस्कृताच्या ह्या दीर्घकालीन विकासाकडे लक्ष दिलें असतां असें दिसून येईल कीं, उत्तर हिंदुस्थानांतील लक्षावधि लोकांनीं स्वतःच्या भाषा सोडल्यावरहि रोजच्या व्यवहारांत संस्कृताचा नव्हे तर प्रथम कदाचित् कांहीं काळ असंस्कृत व नंतर प्राकृत व त्यानंतर प्रसृत झालेल्या भाषांचाच उपयोग केला होता. आणि दक्षिण हिंदुस्थानच्या आजच्या भाषा तर भाषेच्या दृष्टीनें भिन्नवंशीय आहेत आणि आर्यांच्या भाषेचा तेथें केव्हांहि पगडा बसला नाहीं. आज अनेक वर्षांच्या संस्कृतिसंगमामुळें ह्या द्रविड भाषेंत कांहीं संस्कृत अगर संस्कृतोद्भव शब्द आढळून आले तर तें अपरिहार्यच होतें.

### अल्पसंख्य पंडितांची ' देवभाषा '

ह्या विवेचनावरून हें स्पष्ट होईल कीं संस्कृत ही एकेकाळीं भारतीयांची बोलभाषा होती असें जें सरसकट विधान केलें जातें तें किती मर्यादित स्वरूपांत खरें आहे. कित्येक वेळीं असाहि मुद्दा पुढें करण्यांत येतो कीं आजदेखील कित्येक विद्वान् संस्कृत शास्त्रीपंडित अगदीं आपल्या मातृभाषेइतक्या सहजपणें संस्कृतांत बोलूं शकतात; तेव्हां संस्कृत ही राष्ट्रभाषा म्हणून उपयोगांत आणण्यास कोणतीच

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## संस्कृत ही कधीं राष्ट्रभाषा होती काय ?

तील भाषा अधिक जवळची आहे. आणि असें असूनहि संस्कृतला राष्ट्रभाषा करण्याविषयीं जेव्हां आग्रहपूर्वक प्रतिपादन होतें तेव्हां ह्या दोन स्वरूपां- पैकीं नेमक्या कोणत्या स्वरूपाला उद्देशून हा ' संस्कृत ' शब्द वापरला जात आहे तें स्पष्ट कर- ण्यांत येत नाहीं. ह्या दोन स्वरूपांपैकीं आज जिच्याशीं कांहींजणांची तोंडओळख आहे ती म्हणजे रामायण-महाभारतासारख्या ग्रंथांत व कालि- दासादिकांच्या अमर कृतीत आढळणारी उत्तर- कालीन संस्कृत भाषा होय. आणि वर म्हटल्याप्रमाणें हें स्वरूप वेदांतील स्वरूपापेक्षां इतकें भिन्न आहे कीं ज्यानें केवळ संस्कृत काव्यांचा अभ्यास केला असेल त्याला वेदांतील एकाहि ऋचेचा अर्थ लागणें कठिण आणि वेदकालीन संस्कृताविषयीं बोलावयाचें म्हणजे त्याचें व्याकरण इतकें अवघड आहे कीं आज संस्कृतचें साधारण ज्ञान असणाऱ्यांनासुद्धां ह्या भाषेच्या त्या स्वरूपांत व्यवहार करणें दुर्घट आहे.

### प्राकृतांचा विकास

संस्कृत भाषेच्या ह्या भिन्न स्वरूपांविषयीं नीट विचार केला म्हणजे ' संस्कृत ही एकदां भारताची बोलभाषा होती ' ह्या वाक्याचा अर्थ किती मर्या- दित स्वरूपांत स्वीकारतां येतो हें ध्यानांत येईल. प्रथमतः हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, ज्या कांहीं आर्यांच्या टोळ्या हिंदुस्थानांत प्रथम आल्या आणि कांहीं काल हिंदुस्थानच्या वायव्य व उत्तर विभागांत वास्तव्य करून राहिल्या, त्यांच्यांतच वेदांत आढळ- णाऱ्या संस्कृतासारखी एक भाषा रोजच्या व्यवहारा- साठीं उपयोगांत होती. परंतु या टोळ्या येथें येण्या- पूर्वींच ह्या देशांत वसति करून राहिलेल्या लक्षावधि लोकांच्या संख्येच्या मानानें ह्या संस्कृत भाषिकांची संख्या किती अल्प असणार ! आणि या आर्ये- तरांच्या, त्यांच्या दैनंदिन व्यवहारास पूर्णपणें उपयुक्त ठरलेल्या अशा भाषा होत्याच. ह्या आर्येतरांनीं मग जेव्हां जेत्यांची संस्कृत भाषा त्यांच्या व्यवहारांत ... तेव्हां त्यांच्यांतील कांहीं-

संस्कारांच्या लोकांचा असा संगम झाल्यामुळें आणि एखाद्या भाषेचा नैसर्गिक विकास ज्या विशिष्ट नियमांनुसार होतो त्यामुळेंहि ही वेदकालीन संस्कृत भाषा निरनिराळ्या प्राकृतांत परिणत झाली. ह्या निरनिराळ्या प्राकृतांचीं नांवें पाहिलीं म्हणजे ह्या भाषा कांहीं भौगोलिक मर्यादा किंवा भिन्न भिन्न व्यवसाय करणारे समुदाय यांच्यांत प्रथम रूढ झाल्या असाव्यात असें दिसतें. ह्यांपैकीं प्राकृताचीं महाराष्ट्री, मागधी, शौरसेनी यांसारखीं नांवें पाहतां दुसरी एक गोष्ट ठळकपणें ध्यानांत येते. ती अशी कीं ह्या ' प्राकृत ' अवस्थेंत सुद्धां ह्या आर्यभाषांचा प्रसार महाराष्ट्राच्या खालीं दक्षिणेंत झाला नव्हता. याच निरनिराळ्या प्राकृतांना पुढें अपभ्रंश स्वरूप मिळालें आणि ह्या अपभ्रंशापासून उत्तर हिंदुस्थानांतील प्रांतिक बोलभाषांचा जन्म झालेला आहे. वेदकालीन संस्कृताच्या ह्या दीर्घकालीन विकासाकडे लक्ष दिलें असतां असें दिसून येईल कीं, उत्तर हिंदुस्थानांतील लक्षावधि लोकांनीं स्वतःच्या भाषा सोडल्यावरहि रोजच्या व्यवहारांत संस्कृताचा नव्हे तर प्रथम कदाचित् कांहीं काळ असंस्कृत व नंतर प्राकृत व त्यानंतर प्रसृत झालेल्या भाषांचाच उपयोग केला होता. आणि दक्षिण हिंदुस्थानच्या आजच्या भाषा तर भाषेच्या दृष्टीनें भिन्नवंशीय आहेत आणि आर्यांच्या भाषेचा तेथें केव्हांहि पगडा बसला नाहीं. आज अनेक वर्षांच्या संस्कृतिसंगमामुळें ह्या द्रविड भाषेंत कांहीं संस्कृत अगर संस्कृतोद्भव शब्द आढ- ळून आले तर तें अपरिहार्यच होतें.

### अल्पसंख्य पंडितांची ' देवभाषा '

ह्या विवेचनावरून हें स्पष्ट होईल कीं संस्कृत ही एकेकाळीं भारतीयांची बोलभाषा होती असें जें सरसकट विधान केलें जातें तें किती मर्यादित स्वरू- पांत खरें आहे. कित्येक वेळीं असाहि मुद्दा पुढें करण्यांत येतो कीं आजदेखील कित्येक विद्वान् संस्कृत शास्त्रीपंडित अगदीं आपल्या मातृभाषेइतक्या सहजपणें संस्कृतांत बोलूं शकतात; तेव्हां संस्कृत ही राष्ट्रभाषा म्हणून उपयोगांत आणण्यास कोणतीच



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

संस्कृत भाषेंत विचारांची देवघेव करणें अगदींच अशक्य नाहीं. पण ज्या लक्षावधि सामान्य जनतेच्या दृष्टीनें आपण ह्या राष्ट्रभाषेच्या प्रश्नाचा विचार करीत आहों तिच्या दृष्टीनें ह्या पंडितांच्या उदाहरणाचा कांहींच उपयोग नाहीं. महाभाष्यकार पतञ्जलीच्या ग्रंथावरून देखील हेंच सिद्ध होतें कीं, प्राचीनकालींदेखील संस्कृतचा शास्त्रशुद्ध उपयोग फक्त समाजांतील शिष्ट अगर अतिशय विद्वान् अशी मंडळीच तेवढी करूं शकत असत. आणि इतरेजनांच्या बोलींत एका संस्कृत शुद्ध रूपाच्या अनेक विकृती आढळत. त्या प्राचीन कालानंतर शास्त्रशुद्ध संस्कृत बोलणाऱ्यांची संख्या दिवसेंदिवस कमीच होत चालली आणि तिचा उपयोग साहित्यासाठीं जरी कांहीं काळ चालूं राहिला तरी प्राकृत व अपभ्रंश यांमध्येंहि पुढें विपुल वाङ्मय लिहिलें गेलें आणि अलीकडे तर लिहिण्यासाठीं वा बोलण्यासाठीं सरसकट मातृभाषांचाच उपयोग होत आहे. संस्कृत नाटकांतून, विशेषतः ह्या नाट्यवाङ्मयाच्या आरंभकालीं निरनिराळ्या पात्रांच्या तोंडीं ज्या भाषा दिलेल्या आढळतात त्याकडे पाहिलें असतांहि असें आढळून येईल कीं समाजांतील विशेष प्रतिष्ठित व शिक्षित पुरुषवर्गाच्या तोंडीं संस्कृत भाषा व सामान्यतः स्त्रिया व व्यापारउदीम करणारे, मच्छीमारीचा धंदा करणारे, द्यूत खेळणारे, किंवा नोकरीचाकरी करणारे यांच्या तोंडीं प्राकृत भाषा आहेत. किंबहुना 'संस्कृत' हा शब्दच, ज्या भाषेवर कांहीं विशिष्ट संस्कार झाले आहेत, व जिचा उपयोग सुशिक्षित मंडळींतच होत असल्यामुळें जी दुष्ट शब्दप्रयोगापासून अलिप्त आहे ती भाषा, हें दर्शवितो. संस्कृत भाषेला 'देवभाषा' म्हणजे देवाची अगर जे आपल्या विद्वत्तेमुळें देवसदृश आहेत त्यांची भाषा, असेंहि म्हणतात. नमिसाधूनें संस्कृत व प्राकृत भाषेविषयीं असें म्हटलें आहे कीं ज्या भाषांची 'प्रकृति' लोकांना सहज वाटणाऱ्या व रोजच्या व्यवहारांत येणाऱ्या भाषेंत आहे त्यांना प्राकृत असें नांव आहे, तर जी भाषा केवळ देवांची अगर पंडितांची आहे तिला संस्कृत असें म्हणतात.

हिंदुधर्माखेरीज ह्या भारतवर्षांत बुद्ध व जैन अशा दोन लोकप्रिय धर्मांचा उदय झाला. ज्याप्रमाणें संस्कृत ही हिंदूंच्या धर्म-ग्रंथांची भाषा आहे त्याचप्रमाणें पाली ही बौद्धांच्या व अर्धमागधी ही जैनांच्या धर्मग्रंथांची भाषा आहे आणि ह्या दोन्ही प्रमुख प्राकृत भाषा आहेत. त्यांमधील वाङ्मय हें इतकें विपुल व विविध आहे कीं संस्कृत भाषेप्रमाणेंच ह्या दोन भाषाहि ह्या देशाच्या सांस्कृतिक भाषा म्हणतां येतील आणि पूर्वकालाकडून वर्तमान कालाकडे दृष्टि टाकली तरी असें दिसून येईल कीं, अजूनहि हिंदुस्थानांतील कित्येक आदिवासी अशा बोली बोलत आहेत कीं ज्यांच्यावर संस्कृत भाषेची कांहींच छाप दिसत नाहीं.

## संस्कृतनें संस्कृतीचा वारसा टिकवून ठेविला

ह्यावरून हें स्पष्टपणें दिसून येईल कीं संस्कृत भाषा ही राष्ट्रभाषा म्हणून अट्टाहासानें ठोकून बसविणें हा शक्तीचा मोठा अपव्यय आहे. कारण दक्षिण हिंदुस्थानांतील द्रविड भाषांवर या भाषेचा फारच थोडा परिणाम झालेला आहे व उत्तर हिंदुस्थानांतीलहि ती सर्व लोकांची दैनंदिन व्यवहाराची भाषा कधींच नव्हती. ज्यांना शिक्षणाची संधि मिळाली त्यांनींच केवळ तिचा अभ्यास केला व त्यांच्यांतीलहि कांहींजणांनीं तिचा बोलभाषा म्हणून उपयोग केला. आणि नंतरच्या काळांतहि जेव्हां हिंदु भारताची संस्कृत ही धर्म व संस्कृति यांची भाषा झाली तेव्हांहि मुसलमानी व ब्रिटिश अमलांपूर्वींच्या हिंदु राजांच्या व पंडितांच्या मनांत संस्कृतला रोजची बोलण्याची भाषा करण्याचें कधींच आलें नाहीं. गुप्त सम्राटांच्या कालांत संस्कृत वाङ्मय अतिशय भरभराटीस आलें; पण म्हणून ह्या राज्यकर्त्यांनीं त्यांच्या प्रजाजनांची प्राकृत वा तत्सम बोली दडपून व त्याऐवजीं संस्कृतचाच उपयोग बोलण्यासाठीं आवश्यक करून भाषेच्या विकासाचें चक्र पुन्हां मागें फिरविण्याचा कधींच प्रयत्न केला नाहीं.

ह्या लेख लिहिण्यांत संस्कृत भाषेचें महत्त्व कमी करण्याचा लेखकाचा हेतु नाहीं. हिंदुस्थानांतील शेंकडों वर्षांपूर्वींची संस्कृति व इतिहास समजून घेण्याच्या दृष्टीनें व कमींत कमी तीन-चार हजार वर्षें तरी या भाषेचा अखंडित विकास या ना त्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# संस्कृत ही कधीं राष्ट्रभाषा होती काय ?

रीतीनें होत गेला. या दृष्टीनेंहि संस्कृतचें स्थान अद्वितीय आहे. संस्कृत ही आमची राष्ट्रभाषा होती व ह्यापुढें अनेक वर्षें राहीलहि पण ती एका मर्यादित अर्थानें. कारण ह्या भारतवर्षांतील बहुसंख्य हिंदु जनतेच्या जीवनावर व अनेकविध व्यवहारांवर तिचा पगडा अजून कैक शतकें अबाधित राहणार आहे. आणि म्हणूनच ह्या भाषेच्या अभ्यासाचा विद्यापीठांतून जोरदार पुरस्कार व्हावयास पाहिजे. संस्कृत भाषेचा अव्हेर म्हणजे आमच्या मौलिक संस्कृतीकडे व भव्य इतिहासाकडे एकदम पाठ करणें आहे. परंतु संस्कृतीचा वारसा टिकवून ठेवण्यासाठीं संस्कृतचा अभ्यास करणें निराळे आणि तिचा रोजच्या व्यवहारासाठीं सरसकट सर्व लोकांकडून उपयोग झाला पाहिजे हें म्हणणे निराळें. ह्या दुसऱ्या अर्थानें मात्र संस्कृत ही या देशाची राष्ट्रभाषा कधींच नव्हती आणि ह्यापुढें व्हावी हें म्हणणेंहि योग्य दिसत नाहीं.

---

## कला व नीति ( पान ४४ वरून पुढें चालू )

शिवाय जर कलेला अस्तित्व नाहीं, तर कलाविलास हा नेहमीं नीतियुक्तच असला पाहिजे असें त्यावरून ठरत नाहीं काय ?

कला व नीति यांत विरोध नाहीं एवढेंच केवळ वरील विवेचनांतून निष्पन्न होत नाहीं. तर नीतिवाद्यांना ज्याचा अजिबात विसर पडतो असें त्याहूनहि एक अधिक महत्त्वाचें तत्त्व त्यावरून सिद्ध होतें. तें हें कीं, नीतीपेक्षां सौन्दर्य अधिक उच्च आहे. म्हणून कलेला नीतीची बटीक म्हणून राबविण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं. नीति म्हणजे सदाचरण व सदाचरण म्हणजे ज्या आचरणाचे परिणाम सुखमय, ज्ञानमय वा सौन्दर्यमय असतात तें आचरण. अर्थात् नीति हें केवळ सौन्दर्याचें साधन आहे. 'सौन्दर्य' हें एक नीतीचें साध्य आहे. म्हणून अमुक कला अनीतिपोषक व म्हणून वाईट असें म्हणणें म्हणजे साध्यापेक्षां साधनाला जास्त महत्त्व देण्यासारखें आहे. ती जर खरोखरच कला असेल तर ती सौन्दर्यमय असलीच पाहिजे व ती जर अनीतिमय असेल तर ज्या नीतितत्त्वांच्या आधारें ती अनीतिमय किंवा वाईट ठरेल ती नीतितत्त्वेंच वाईट म्हणून झुगारून दिलीं पाहिजेत. जी नीति सौंदर्याला वाईट ठरवूं शकते ती नीतिच कुनीति आहे.

---

## जीवन कसें आहे ?

बुद्ध, लाओत्से व कुन्फुत्से ( कॉन्फ्यूशियस ) हे साधारणपणें समकालीन समजले जातात. चीनमध्यें अशी एक समजूत आहे कीं एकाच सुरईतील मदिरा चाखून पाहून या तिघांनीं तीन प्रकारें मत दिलें. यासंबंधीं एक विख्यात जपानी चित्रहि आहे.

बुद्ध—जीवनमदिरा तिक्त आहे; कडवट आहे.

लाओत्से— जीवनसुधा मधुर आहे; गोड आहे.

कुन्फुत्से—कडूहि नाहीं, गोडहि नाहीं; जीवनरस, बस्स, आंबटच आंबट आहे.

—" जीवन-साहित्य " जून, १९५०

---



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. अ. दा. कामत

# कोंडींत सांपडलेलें साम्राज्य!

दुसऱ्या महायुद्धानंतर ब्रिटन आणि पश्चिम युरोपांतील इतर सम्राज्यवादी राष्ट्रें यांची परिस्थिति बिकट झालेली आपण पाहातों. व्हीटनाम, मलायापासून आफ्रिकेंतील गोल्ड कोस्ट, नायजेरियापर्यंत उफाळलेल्या अंकित जनतेच्या उठावांमुळें पाश्चात्य देशांच्या साम्राज्यवादी अर्थव्यवस्थेला तडे पडत आहेत. डॉलर-तुटवड्याच्या रूपानें गंभीर आर्थिक पेंचप्रसंग उभा राहिला आहे. या अडचणींतून मार्ग काढण्याच्या धडपडींत पाश्चात्य साम्राज्यवादी सत्ताधारी आपल्या देशांना अमेरिकेच्या आर्थिक व राजकीय वर्चस्वाखालीं नेत आहेत. स्वतःला समाजवादी म्हणविणारे बेव्हिनसारखे मजूरपक्षीय आणि चर्चिलसारखे प्रतिगामी यांच्या साम्राज्यविषयक व इतर धोरणांत काडीइतकाहि मूलभूत फरक दिसत नाहीं असें विलक्षण दृश्य आज दिसतें.

युरोपीय साम्राज्यशाहीची—आणि विशेषतः साती समुद्रांवर सत्ता सांगणाऱ्या ब्रिटनची—आजची कोंडी कां निर्माण झाली? या प्रश्नाचें साधार व सखोल विवेचन सुप्रसिद्ध ब्रिटिश मार्क्सवादी रजनी पामदत्त[1] यांनीं 'Britain's Crisis of Empire' ("ब्रिटनचा साम्राज्यविषयक पेंचप्रसंग") हें अन्वर्थक नांव असलेल्या आपल्या नव्या पुस्तकांत केलें आहे.

अवघ्या एकसेंसाठ पृष्ठांत भरगच्च आंकडेवारी आणि उतारे यांच्या साहाय्यानें पामदत्त यांनीं आपलें म्हणणें सडेतोडपणानें मांडलें आहे. त्यांच्या सर्व मुद्द्यांची ओळख एका लेखांत करून देणें शक्य नाहीं. म्हणून त्यांच्या विवेचनावरून निघणारे निष्कर्ष प्रथम थोडक्यांत सांगून त्यांपैकीं कांहीं निष्कर्षांसंबंधींचें त्यांचें विवेचन पुढें दिलें आहे.

पामदत्त यांच्या मतें:—

(१) अंकित प्रदेशांतील जनतेचे वाढते स्वातंत्र्यवादी उठाव, युरोपीय साम्राज्यवादी देशांच्या अंतर्गत अर्थव्यवस्थेचें वाढतें दौर्बल्य आणि साम्राज्यविरोधी जनतेच्या आघाडीची वाढती शक्ति या कारणांमुळें सर्व साम्राज्यवादच कोंडींत सांपडल्यासारखा झाला आहे.

(२) यामुळें साम्राज्यशाहीला कांहीं ठिकाणीं

---

१ रजनी पामदत्त हे विद्वान् व व्यासंगी लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत. 'पामदत्त' या त्यांच्या आडनांवांत स्वीडिश आईचें 'पाम' आणि हिंदी वडिलांचें 'दत्त' हीं नांवें एकवटलीं आहेत. त्यांचे वडील डॉ. दत्त हे इंग्लंडमध्यें स्थायिक होऊन वैद्यकीय व्यवसाय करीत होते. रजनी पामदत्त हे ब्रिटिश कम्युनिस्ट पक्षाच्या संस्थापकांपैकीं एक असून गेलीं तीस वर्षें त्या चळवळींत भाग घेत आहेत. सध्यां ते ब्रिटिश कम्युनिस्ट पक्षाचे उपाध्यक्ष आहेत. 'लेबर मंथली' या मासिकाचे ते संपादक असून त्यांनीं अनेक ग्रंथ लिहिले आहेत. 'आजचा हिंदुस्थान' हा त्यांचा ग्रंथ आपल्या विशेष परिचयाचा आहे. हिंदी स्वातंत्र्याचे कट्टे पुरस्कर्ते म्हणून हिंदी जनतेस ते माहीत आहेत. १९४६ सालीं ते हिंदुस्थानांत सहा महिने दौरा काढून गेले.—त्यांचें 'ब्रिटन्स क्रायसिस ऑफ एम्पायर' हें (लॉरेन्स विशार्टचें) १९४९ सालचें प्रकाशन आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

पीछेहाटीचें आणि '.सत्तांतरा 'चें धोरण घ्यावें लागत असलें तरी साम्राज्यवादी मक्तेदारांचें हित सांभाळण्यासाठीं कोट्यवधि साम्राज्यांतर्गत जनतेची पिळणूक नवनव्या रूपांनीं तशीच कायम आहे. "पाश्चिमात्य संस्कृति", "लोकशाही" इत्यादि घोषणा पिळणुकीच्या दुष्ट पायावरच उभारलेल्या आहेत. साम्राज्यवादी सत्ताधाऱ्यांचा बिलकूल "हृदयपालट" झालेला नाहीं.

( ३ ) ब्रिटनची आज आयात-निर्यातीची तोंड-मिळवणी होत नाहीं, आणि निर्वाणीचे उपाय योज्-नहि ही तूट भरून निघत नाहीं. याचें मुख्य कारण ब्रिटनची साम्राज्यवादी अर्थव्यवस्था कोसळूं लागली आहे हेंच आहे; आणि साम्राज्यवादी चौकट कायम ठेवून योजलेले कोणतेहि उपाय, मग ते कितीहि निर्वाणीचे असोत, यशस्वी होणार नाहींत.

( ४ ) साम्राज्य टिकविण्यासाठीं आणि अंकित प्रदेशांची ' सुधारणा ' करण्यासाठीं म्हणजे ( अधिक पिळणुकीसाठीं ) ब्रिटिश सत्ताधारी आज जे अनेक प्रयत्न करीत आहेत त्यामुळें आयात-निर्यातीची तोंडमिळवणी होणार तर नाहींच, उलट तद्विषयक लष्करी व इतर खर्चाचा बोजा वाढून हा पेंच अधिकच वाढत जाईल.

( ५ ) बेव्हिन व चर्चिल यांच्या परराष्ट्रीय आणि इतर धोरणांतील सारखेपणाचें कारण साम्राज्यशाही पिळणूक टिकविण्याच्या बाबतींत दोघांचीहि एक-वाक्यता हेंच आहे.

( ६ ) म्हणूनच अमेरिकन साम्राज्यवाद्यांच्या रथाला ब्रिटनचा गाडा जोडण्याच्या कामीं दोघेही सारखेच तत्पर दिसतात. साम्राज्य टिकविण्याच्या या अट्टाहासामुळें ब्रिटन ( साम्राज्यासुद्धां ! ) अखेर अमेरिकन साम्राज्यानें ग्रासलें जात आहे.

ब्रिटनमध्यें औद्योगिक क्रांति सर्वांत आधीं झाल्यामुळें एकोणिसाव्या शतकांत जगाची बाजार-पेठ ब्रिटनच्या हातीं होती. औद्योगिक दृष्ट्या सर्वांत पुढारलेलें राष्ट्र—"जगाची उद्योगशाळा"—हा ब्रिटनचा दर्जा सुमारें १८८० पर्यंत कायम होता. त्यानंतर अमेरिका आणि जर्मनी हे देश झपाट्यानें प्रगत होऊं लागले आणि लवकरच औद्योगिक दृष्ट्या त्यांनीं ब्रिटनला मागें टाकलें. पोलादाच्या उत्पादनाचे खालील आंकडे[२] ही गोष्ट स्पष्टपणें दर्शवितात.

याप्रमाणें जगाच्या बाजारपेठेंत ब्रिटनला प्रति-स्पर्धी उभे राहूं लागले. तरी पण साम्राज्यविस्तार आणि निर्यात व्यापार या दोन्ही बाबतींत ब्रिटननें आपलें पहिलें स्थान बराच काळ कायम राखलें. सन १८८४ ते १९०० या अवघ्या सोळा वर्षांत ब्रिटननें ३७ लक्ष चौ. मैलांचा प्रदेश बळकावला. १९१४ सालीं ब्रिटिश साम्राज्याचा विस्तार १२७ लक्ष चौ. मैल ( म्हणजे ब्रिटनच्या शंभर पटींहून अधिक ) इतका वाढला. जगाचा चौथा हिस्सा क्षेत्रफळ आणि तितकाच हिस्सा लोकसंख्या यांवर ब्रिटिश साम्राज्यशाही पिळणुकीचें क्षेत्र पसरलें.

ब्रिटिश भांडवलदारांनीं साम्राज्यांतील प्रदेशांत ( व इतरत्रही ) भांडवल पेरण्यास सुरुवात केली. सत्तेचा कच्चा माल आणि स्वस्त मजूरी यांमुळें व्यापारापेक्षां बाहेर देशांत पेरलेलें भांडवलच भरम-साट नफा देऊं लागलें. अंकित जनतेच्या पिळ-णुकीचा हा नवा प्रकार सुरू झाला. औद्योगिक दृष्ट्या मागें पडत चाललेलें ब्रिटन भांडवलनिर्या-तीच्या बाबतींत अनेक वर्षें—पहिल्या महायुद्धापर्यंत—अग्रेसर राहिलें. यामुळें ब्रिटिश भांडवलदारीचें जुनें स्वरूप बदलून तिला परजीवी, बांडगुळी स्वरूप येऊं लागलें.

सन १८५० ते १८८० या अवधींत ब्रिटननें

---

२

( आंकडे लक्ष टनांचे )

| सन | ब्रिटन | जर्मनी | अमेरिका |
|---|---|---|---|
| १८८० | १३ | ७ | १२ |
| १९०० | ४९ | ६४ | १०२ |
| १९१३ | ५१ | १८९ | ३१३ |




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

परदेशीं गुंतविलेलें भांडवल २० कोटि पौंडांपासून १०० कोटि पौंडांपर्यंत, म्हणजे पांचपट वाढलें; १९०५ सालीं तें २०० कोटि पौंड आणि १९१३ सालीं ४०० कोटि पौंडांपर्यंत पोंचलें. १८९९ सालीं निर्यात व्यापारापासून ब्रिटनला १·८ कोटि पौंड नफा झाला तर परदेशीं गुंतविलेल्या भांडवलापासून त्याचे पांच पट, म्हणजे ९ कोटि पौंड फायदा झाला ! १९१२ सालीं हें व्याजाचें उत्पन्न १७·६ कोटि पौंड आणि १९२९ सालीं २५ कोटि पौंड, याप्रमाणें वाढत गेलें. व्यापारापेक्षां व्याजबट्ट्याचें उत्पन्नच अनेक पटींनीं होत असल्यानें ब्रिटनची अर्थव्यवस्था यापुढें या सावकारीवर आणि तदंगभूत साम्राज्यांतील प्रजेच्या शोषणावरच मुख्यतः आधारली गेली; ती परजीवी बनली. या घटनेचे अनेक दूरगामी परिणाम होणें अपरिहार्य होतें.

साम्राज्यांत व परदेशांत भांडवल गुंतवून भरमसाट नफा मिळत असल्यामुळें ब्रिटिश साम्राज्यवाद्यांनीं स्वतःच्या देशांतील कमी किफायतशीर कारखानदारी व उद्योगधंदे यांजकडे दुर्लक्ष केलें. ब्रिटनमधील कोळशाच्या खाणींची दुर्दशा सुप्रसिद्धच आहे. सन १८८६ ते १९१३ या सुमारें तीस वर्षांत लोखंड पोलादाच्या धंद्यांत बिलकूल सुधारणा झाली नाहीं; परिणामीं जर्मनी व अमेरिका यांनीं ब्रिटनला झपाट्यानें मागें टाकलें. एकूण औद्योगिक उत्पादनच घटत गेलें. कोळशाचें उत्खनन १९१३ पासून १९३८ पर्यंत २८·७ कोटि टनांपासून २३ कोटि टनांवर घसरलें आणि खाणींची संख्या ३२६७ हून २११५ वर आली. सुताच्या गिरण्यांत १९२० ते १९३५ या पंधरा वर्षांत १·४ कोटि चात्या नष्ट झाल्या; आणि जहाज बांधणीचे कारखाने तिसऱ्या हिश्शानें बंद पडले.

ब्रिटनमधील शेती चांगलीच मागें पडली. १८७० ते १९३८ या काळांत लागवडीखालीं असलेली जमीन १८२ लक्ष एकरांवरून ११८ लक्ष एकरांवर आली; आणि अन्नधान्य पिकविणाऱ्या जमिनींत दोनपंचमांशानें घट झाली. गव्हाच्या लागवडीखालीं असलेली जमीन ३७ लक्ष एकरांपासून १७ लक्ष एकराइतकी कमी झाली. दुसऱ्या महायुद्धांत व नंतर शेतीच्या दुर्दशेचे परिणाम ब्रिटिश जनतेला भोगावे लागत आहेत.

विशेषतः मूलभूत उद्योगधंद्यांची हेळसांड झाली हें पुढील आंकड्यांवरून दिसतें : १९०४–१३ आणि १९२४–२८ हे कालखंड पाहता मूलभूत उद्योगधंद्यांतील भांडवल ४·१७ कोटि पौंडांवरून २·१४ कोटि पौंडांपर्यंत घसरलें. उलट दारू गाळण्याच्या धंद्यांत तें ६० लक्ष पौंडांवरून १५० लक्ष पौंडांपर्यंत वाढलें आणि हॉटेलें, थिएटरें वगैरे धंद्यांत ७१ लक्ष पौंडांवरून २०४ लक्ष पौंडांवर गेलें !

प्रत्यक्ष उत्पादनांत भाग घेणाऱ्या लोकसंख्येचें प्रमाण अर्थातच याच अनुरोधानें घटणें स्वाभाविक होतें. १८५१ सालीं काम अथवा व्यवसाय करणाऱ्यांपैकीं २३ टक्के कामगार मूलभूत उद्योगधंद्यांत होते. १९२९ सालीं हें प्रमाण १३·६ टक्क्यांवर आलें. उलट पक्षीं, व्यापारी व दलाली, कचेऱ्या आणि इतर पांढरपेशे व्यवसाय यांतील नोकरांची संख्या किती तरी वाढली. आतां परदेशांत भांडवल गुंतविणें हाच ब्रिटनचा सर्वांत मोठा "धंदा" झाला आहे असे उद्गार १९३७ सालीं इकॉनॉमिस्ट या ब्रिटिश भांडवली वृत्तपत्रानें या सर्व प्रकाराला अनुलक्षून काढले होते.

आयात-निर्यात व्यापारावरून ब्रिटिश अर्थव्यवस्थेचें परपुष्ट स्वरूप तात्रतेनें लक्षांत येतें. पहिल्या महायुद्धापूर्वीं आयात मालाच्या किंमतीच्या फक्त ⅘ किंमतीचा माल ब्रिटन निर्यात करीत असे. बाकीची एकपंचमांश आयात ही भांडवलावरील व्याज, जहाजी वाहतुकीचें उत्पन्न आणि साम्राज्यावरील आर्थिक व राजकीय वर्चस्वामुळें लुबाडतां येणारें इतर ‘अदृश्य’ उत्पन्न यांमधून होत असे. दुसऱ्या महायुद्धाच्या सुमारास हें "अदृश्य आयाती" (इनव्हिजिबल इम्पोर्ट्स्) चें प्रमाण दोन पंचमांशांपर्यंत वाढलें. यावरून ब्रिटिश अर्थव्यवस्था कशी परजीवी बनली होती हें दिसून येतें.

पहिल्या महायुद्धानंतर साम्राज्यांतील अंकित जनतेचे उठाव अधिकाधिक तीव्र होऊं लागले. दुसरीकडे निर्यात व्यापारांत, इतकेंच नव्हे तर, भांडवलनिर्यातींतही अमेरिकेच्या मानानें ब्रिटन



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

मागें पडूं लागलें. या तडाख्यामुळें ब्रिटिश अर्थ-व्यवस्थेचा पाया जी "अदृश्य आयात" तिला जोराचे धक्के बसूं लागले. आयात-निर्यातीमधील तफावत सारखी वाढत होती. आयात-निर्यातीमधील तफावतीचे पुढील आंकडे पहा :

सन१८५५ : ३कोटि पौंड;सन१९१३ : १३·४कोटि
सन१९३८ : ३०·२कोटि;सन१९४७:४३·८कोटि.

प्रथम प्रथम ब्रिटिश भांडवलदार साम्राज्याचा विस्तार वाढवून आणि पिळणूक अधिक तीव्र करून औद्योगिक दृष्ट्या अधिक प्रगत असलेल्या अमेरिकन, जर्मन भांडवलदारांच्या स्पर्धेला तोंड देत असत. दिवसेंदिवस वरील कारणांमुळें तें दूरापास्त होऊं लागलें. परदेशांत पेरलेल्या भांडवलावरील व्याजांतूनहि आयात-निर्यातीची तोंडमिळवणी होणें अशक्य होऊं लागलें. येण्या-देण्यांत चक्क तूट येऊं लागली. १९३८ सालीं व्यापार, व्याज वगैरे सर्व येणीं-देणीं जमेस धरतां ब्रिटनला ७ कोटि पौंडाची तफावत आली. दुसऱ्या महायुद्धांत ही तफावत वाढूं लागली. १९४६ सालीं ही तफावत ३८ कोटि पौंड आणि १९४७ मध्यें ६३ कोटि पौंड इतकी वाढली. ब्रिटनला सावकाराचें (अमेरिकेचें) घर पाहावें लागलें. परदेशांत पेरलेल्या ब्रिटिश भांडवलाचा सांठा घसरूं लागला. यामुळें "अदृश्य आयात" करणें अधिकच कठिण होऊन ब्रिटिश साम्राज्यवादी अर्थव्यवस्थेपुढील ही समस्या अधिक बिकट होत जाणार असें पामदत्त यांचें म्हणणें आहे.

दुसऱ्या महायुद्धानंतर ब्रिटन (आणि पश्चिम युरोपांतील साम्राज्यवादी देश) यांची अर्थव्यवस्था सांवरली जात नाहीं, याचें मुख्य कारण त्यांच्या अर्थव्यवस्थेचा परजीवी पाया हेंच आहे.

एकीकडे साम्राज्यांतील प्रजेच्या वाढत्या विरोधाचे तीव्र चटके बसत आहेत. दुसऱ्या बाजूनें या जुन्या साम्राज्यवादी देशांच्या अर्थव्यवस्थेचा औद्योगिक मागसलेपणा आणि युद्धांत झालेली हानि यांचा फायदा घेऊन अमेरिकन मक्तेदार व्यापार आणि भांडवल या दोन्ही क्षेत्रांत त्यांच्या आर्थिक हितसंबंधांचा कब्जा घेत आहेत. अशा प्रकारेंच्या पश्चिम युरोपांतील साम्राज्यवादी राष्ट्रांचा आर्थिक पायाच पोखरला जात आहे. व्याज, नफा वगैरे रूपानें साम्राज्यांतून येणाऱ्या खंडणीला गळती लागली आहे; आणि साम्राज्य टिकविण्याच्या अट्टहासामुळें (उदा०—व्हीटनाम, मलाया) लष्करी खर्च भरमसाट वाढून त्यांत भरच पडत चालली आहे. ब्रिटन व पश्चिम युरोपांतील इतर साम्राज्यवादी देश अमेरिका व इतर डॉलर देशांना साम्राज्यांतील (टिन, रबर वगैरे) कचा माल पुरवून डॉलर वस्तूंची खरेदी करीत असत. आतां साम्राज्यांतील 'अदृश्य आयातीला' गळती लागली, अमेरिकेचा साम्राज्यविस्तार वाढला; यामुळें पूर्वीच्या प्रमाणांत कच्चा माल विकून डॉलर मिळणें कठिण झालें आणि डॉलरतुटवड्याचा पेंचप्रसंग उभा राहिला. याप्रमाणें विवेचन करून पामदत्त पुढील निष्कर्ष काढतात :

"साम्राज्यवादी अर्थव्यवस्थेचा पेंचप्रसंग डॉलरतुटीच्या पेंचप्रसंगाच्या स्वरूपांत दिसत आहे." (पा. ३९)

मार्शल-योजनेनें साम्राज्यवादी अर्थव्यवस्था सांवरणें मुळींच शक्य होणार नाहीं. कारण या योजनेनुसार मिळणाऱ्या डॉलरमदतीमुळें डॉलर तुटवड्याचा प्रश्न तात्पुरता सुटला तरी तिचा मूलभूत पेंचप्रसंग सुटत नाहीं. उलट ब्रिटन व पश्चिम युरोप सामर्थ्यवान् अमेरिकन मक्तेदारांच्या अधिकाधिक आहारीं जाऊन हा पेंच वाढत जाईल असें पामदत्त यांचें म्हणणें आहे. कारण डॉलरतुटीचा पेंच हा साम्राज्यवादी अर्थव्यवस्थेसमोरील मूलभूत पेंचप्रसंगापासून उद्भवलेला आहे. साम्राज्यवादी चौकटींत राहून तो कसा सुटणार ?

बेव्हिन, ॲटली वगैरे स्वतःला समाजवादी म्हणविणारे ब्रिटिश सत्ताधारी साम्राज्यवादी अर्थव्यवस्थेचा हा पिळणुकीचा पाया सोडण्यास बिलकुल तयार नाहींत हें त्यांच्या धोरणावरून स्वच्छ दिसतें. साम्राज्याची पिळणूक अखंड राखण्यासाठीं ब्रिटनला शांततेच्या काळांतहि भरपूर लष्करी खर्च करावा लागत असे. आणि हा खर्च सारखा वाढतच आला आहे. १९३८ सालीं ब्रिटनचा लष्करी खर्च २६·३ कोटी पौंड होता आणि आतां "समाजवादी" सत्ताधारी बनल्यानंतर १९४९ सालीं तो ८० कोटींवर जाऊन पोंचला आहे ! मलायांतील






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

साम्राज्यशाही युद्ध आणि अटलांटिक करारामुळें पडणारा लष्करी बोजा यांमुळें हा खर्च वाढत जाणार हें उघड आहे. यापायीं अमेरिकन सावकाराच्या ताब्यांत गेलों तरी चालेल पण साम्राज्य सोडणार नाहीं हा मजूरपक्षीय सत्ताधाऱ्यांचा इरादा स्पष्टपणें दिसतो.

असें आहे तर हिंदुस्थान, पाकिस्तान, ब्रह्मदेश येथें झालेल्या सत्तांतराचा अर्थ कसा लावावयाचा ? या प्रश्नाचें उत्तर पामदत्त यांनीं पुढीलप्रमाणें दिलें आहे. प्रत्यक्ष राजकीय सत्ता एतद्देशीय वरिष्ठ वर्गाकडे सोंपवून या देशावरील साम्राज्यवादी आर्थिक व राजकीय वर्चस्व व पिळणूक कायम ठेवण्याचा हा नवा पवित्रा आहे. तसें केलें नसतें तर ब्रिटनला या देशांत भीषण युद्धाला तोंड द्यावें लागलें असतें. हा अवाढव्य लष्करी खर्च, तसेंच अमेरिकन मक्तेदारांचें वाढतें दडपण यांना तोंड देण्यास ब्रिटन अगदीं असमर्थ होतें. या सत्तांतरामुळें एतद्देशीय प्रजेला दडपून ब्रिटिश आर्थिक हितसंबंध ( म्हणजेच पिळणूक ) कायम ठेवण्याचें काम परस्पर तद्देशीय वरिष्ठवर्गीय सत्ताधाऱ्यांकडून केलें जाणार आहे; प्राप्त परिस्थितींत साम्राज्यवादी आर्थिक पिळणूक आणि ब्रिटनची परजीवी अर्थव्यवस्था टिकविण्याचा हाच धूर्त मार्ग शिल्लक होता. या देशांवरील साम्राज्यवादी पकड कायम आहे कीं नाहीं, हें निश्चित करण्यासाठीं पामदत्त यांनीं तीन गमकें नमूद केलीं आहेत : ( १ ) साम्राज्यवादी मक्तेदारांची या देशावर आर्थिक पिळणूक कायम असणें, ( २ ) जागतिक दृष्ट्या साम्राज्यवादी लष्करी व्यूहाचा भाग असणें आणि, ( ३ ) हीं दोन्ही उद्दिष्टें ज्याचेकरवीं पार पाडतां येईल असें राज्ययंत्र असणें. हीं गमकें लावून पाहिल्यास या देशांतील सत्तांतर म्हणजे " साम्राज्य टिकविण्यासाठीं केलेलें सत्तांतर " असें त्याचें स्वरूप दिसतें. पामदत्त यांनीं मजूरपक्षीय साम्राज्यवाद्यांच्या या पवित्र्याला " स्वातंत्र्याचें नवें तंत्र " असें नांव दिलें आहे.

बेव्हिन, ॲटली यांच्या परराष्ट्रीय धोरणाला चार्चिल वगैरे प्रतिगाम्यांचा तत्त्वतः मुळीच विरोध नाहीं. कारण साम्राज्याचा आर्थिक व राजकीय पिळणुकीचा पाया अबाधित राखण्याच्या बाबतींत दोघांचाहि सारखाच अट्टहास आहे. " पाश्चात्य लोकशाही ", " पाश्चात्य संस्कृति ", " मागसलेल्या प्रजेचें राहाणीचें मान सुधारण्याचें उद्दिष्ट " वगैरे बेव्हिनकृत घोषणा चार्चिल ( व ट्रुमन ) यांच्या घोषणांशीं जुळतात यांतील इंगित हेंच आहे. हिंदुस्थानांतील सत्तांतर ( प्रकरण आठवें ) आणि साम्राज्यवादी अर्थव्यवस्था कायम ठेवण्याचें मजूरपक्षीयांचें धोरण ( पा. ३३, २७, १२०, १२६ वगैरे ) याविषयीं पामदत्त यांनीं त्यांचेच उतारे देऊन पुरें माप पदरीं घातलें आहे. " साम्राज्याचें राष्ट्रकुटुंबांत झालेलें रूपांतर ", " हृदयपालट ", " समाजवाद " वगैरेचें खरें स्वरूप उघडकीस आणून पामदत्त यांनीं मजूरपक्षीयांच्या तथाकथित समाजवादाचा चांगलाच दंभस्फोट केला आहे.

ब्रिटनच्या अर्थव्यवस्थेचा पेंचप्रसंग पूर्णपणें समजण्यासाठीं आज प्रबळ अमेरिकन साम्राज्यवाद्यांनीं तिच्यावर चालविलेलें आक्रमण ध्यानांत घेणें जरूर आहे. अमेरिकेची औद्योगिक प्रगति उशिरां सुरू झाली. आणि अमेरिकन भांडवलदार साम्राज्यसंपादनाच्या आखाड्यांत सर्वांत शेवटीं उतरले. पहिल्या महायुद्धापूर्वींच अमेरिकेनें औद्योगिक उत्पादनांत ब्रिटनला मागें टाकलें होतें. तेव्हांपासून अमेरिकन भांडवलदारांना जग जिंकण्याचीं स्वप्नें पडूं लागलीं, हें त्या वेळचे ब्रिटनमधील अमेरिकन वकील पेज यांनीं १९१३ सालीं लिहिलेल्या पत्रांवरून दिसून येतें. " इंग्रजांना वाटतें कीं जग आपल्या मालकीचें आहे. ( पण ) जगाचें भवितव्य खरोखरीं आमच्याच ( अमेरिकेच्या ) हातीं येणार आहे. " ( पा. ४२ वर उद्धृत केलेला उतारा ). त्यानंतरच्या काळांत झालेलीं दोन्ही महायुद्धें अमेरिकन भांडवलदारीला अतिशय लाभदायक झालीं. खुद्द अमेरिकेला युद्धाची झळ पोंचलीच नाहीं. आणि उशिरा युद्धांत पडल्यामुळें प्राणहानीहि फारशी झाली नाहीं. युद्धोत्पादनामुळें औद्योगिक विकास मात्र अतिशय वेगानें झाला. दुसऱ्या महायुद्धानंतर भांडवलदारी जगाच्या उत्पादनापैकीं ६० टक्के भाग अमेरिकेचा आणि ७३ टक्के भांडवल अमेरिकेचें इतक्या प्रचंड प्रमाणांत अमेरिकन भांडवलदारांचें बल वाढलें आहे. व्यापार, जहाजी





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वाहतूक, आरमारी ताकद, बँका, भांडवलाची निर्यात, सर्वच बाबतींत आज अमेरिकेचा वरचष्मा आहे. जगाच्या भांडवल-निर्यातींत अमेरिका व ब्रिटन यांचा हिस्सा दाखविणारे पुढील आंकडे ही गोष्ट स्पष्टपणें दाखवितात.

| सन | अमेरिका | ब्रिटन |
|---|---|---|
| १९३८ | १३ टक्के | १० टक्के |
| १९४७ | ३२ टक्के | १० टक्के |

याप्रमाणें मातलेले अमेरिकन भांडवलदार व्यापार आणि भांडवलनिर्यात याकरितां साम्राज्याचें भक्ष्य शोधूं लागतांच त्यांची दृष्टि जगाचा चतुर्थांश भाग व लोकसंख्या व्यापणाऱ्या अवाढव्य पण दुर्बल ब्रिटिश साम्राज्याकडे प्रथम वळावी यांत नवल नाहीं. इतर ठिकाणीं ते आपलें वर्चस्व पसरवीत आहेतच. पण मुख्यतः ते ब्रिटिश साम्राज्याचे दरवाजे धडाधड उघडीत आहेत हें गेल्या दहा वर्षांतील अमेरिकेच्या निर्यात व्यापाराच्या आंकड्यांवरून सिद्ध होतें. अमेरिकेच्या या रेट्यापुढें दुर्बल ब्रिटिश साम्राज्य-वाद्यांना बहुधा माघार घ्यावी लागत असली तरी असें होतांना संघर्ष होतोच व तो चालूंहि राहतो. अँग्लो–अमेरिकन साम्राज्यावाद्यांची तेढ हें भांडवली अर्थव्यवस्थेच्या सद्यःस्थितीचें एक महत्त्वाचें अंग आहे. मध्यपूर्वेंत, आशियांत, पश्चिम युरोपांत, स्टर्लिंगच्या अवमूल्यनांत, सर्वत्र ही तेढ दिसून येते. आणि प्रत्येक बाबतींत आपली कुवत ओळखून ब्रिटिश सत्ताधाऱ्यांना अमेरिकेच्या आक्रमणापुढें नमावें लागत आहे. साम्राज्यवादी अर्थव्यवस्थेचा पाया जी साम्राज्यवादी पिळणूक ती कायम ठेवायचें म्हटलें कीं, मग बेव्हिन असो कीं चर्चिल असो, ब्रिटिश सत्ताधाऱ्यांना दुसरें गत्यंतरच उरत नाहीं. ब्रिटिश सत्ताधाऱ्यांची आजची अवस्था वर्णन करतांना पामदत्त म्हणतातः—" पूर्वींचे मालक आतां बेलिफ बनले आहेत. साम्राज्य गहाण पडलें; धनकोंनीं फक्त ताबा घ्यायचाच काय तो राहिला आहे. अमेरिकन अधिराज्याच्या छत्राखालींच ब्रिटिश साम्राज्यवाद्यांना स्वतःचें साम्राज्य शाबूत राखणें शक्य आहे " ( पा. ५४–५५ ).

मार्शल-योजना, ट्रूमन-तत्त्व, अटलांटिक करार, लष्करी मदतीच्या इतर योजना, या सर्व भल्या-बुऱ्या साधनांनीं अमेरिकन साम्राज्यवाद्यांचा अमेरिकन साम्राज्य संपादण्याचा डाव आहे. असंख्य लष्करी तळ, वेगवेगळे लष्करी करार, अॅटम गोल, हैड्रोजन गोल हा सर्व खटाटोप जगावर आर्थिक व राजकीय प्रभुत्व लादण्यासाठींच आहे. पण हे सर्व मनोरथ सिद्धीस जाणें आज अशक्य आहे. ब्रिटन साम्राज्य संपादून जगाचा सावकार बनलें पण त्या वेळीं तें खंडणीदाखल सर्वांत अधिक माल आयात करीत होतें. आज अमेरिकेला आयात माल तर नको आणि निर्यात मात्र व्हावयास, भरमसाट व्हावयास, हवी. अमेरिकन साम्राज्य म्हणजे केवळ अंकित प्रदेशच नव्हे तर युरोपांतील सर्व भांडवली देशांच्या अर्थव्यवस्था अमेरिकेच्या गुलाम बनणें असा याचा स्पष्ट अर्थ आहे. भांडवलदारीच्या उतरत्या काळांत हें साधणें फारसें सुलभ नाहीं. आज जगाचा तिसरा हिस्सा भाग भांडवली चौकटींतून निसटला असून बाकीच्या जगांतील साम्राज्यशाही विरोधशक्ती संघटित व सामर्थ्यवान् बनल्या आहेत. याची जाणीव असल्यामुळेंच अमेरिकन साम्राज्यवादी सोव्हिएटविरोधी तिसऱ्या युद्धाची झपाट्यानें तयारी करीत असून त्याची पूर्वतयारी म्हणून अटलांटिक करार, पश्चिम-युरोप-संघ वगैरे साधनांनीं ब्रिटन, फ्रान्स वगैरे देशांना आपल्या दावणींत बांधीत आहेत.

ब्रिटिश जनतेनें हें आपलें भयंकर भवितव्य लक्षांत घेऊन बेव्हिन-चर्चिल वगैरे सत्ताधाऱ्यांच्या आत्मघातकी धोरणाचा त्याग करावा; साम्राज्यवादी पिळणुकीचा पाया सोडून साम्राज्यांतर्गत व बाहेरील देशांचें स्वातंत्र्य, सार्वभौमत्व, समानता व परस्पर-सहकार्य या पायावर नवी समाजवादी घडी उभारावी; नाहीं तर अमेरिकेला हव्या असणाऱ्या महायुद्धांत अमेरिकन राजाचें संरक्षण करणारें प्यादें ही "माना" ची भूमिका ब्रिटनच्या वांट्याला येईल !— असा गंभीर इशारा पामदत्त यांनीं दिला आहे.

साम्राज्यवादी देशांसमोरील समस्येचें सत्यस्वरूप समजण्यासाठीं पामदत्त यांच्या पुस्तकाची बहुमोल मदत होईल. इंग्रजी जाणणाऱ्या वाचकांनीं तें जरूर नजरेखालीं घालावें अशी शिफारस करून हा परिचय-लेख संपवितों.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

डॉ. राधाकृष्णन् — अनुवादक : श्री. के. ए. पोतदार

# व्यक्तिमात्राचे आर्थिक हक्क

१५ ऑगस्ट १९४७ च्या सत्तांतरानंतर,[१] आम्ही आपल्यासाठीं मान्य केलेल्या घटनेनुसार भारतीय संघराज्य हें एक सार्वभौम लोकशाही गणराज्य झाल्याची घोषणा करून आपण दुसरा महत्त्वाचा टप्पा गाठला आहे. प्रौढ-मतदान, अस्पृश्यता आणि जातीय मतदार-संघ यांचा नायनाट, संस्थानांचें एकीकरण, मूलभूत नागरिक-हक्कांना मान्यता, सर्वांसाठीं समान संधि आणि धर्म, वंश, कुल, लिंग, स्थळ किंवा जन्म यांच्यावर आधारलेली विषमता नष्ट करण्याची तरतूद हे सर्व या घटनेंत नमूद केलेले कांहीं प्रगतिपर उपाय आहेत. नेपोलियननें म्हटलें आहे कीं, घटना लहान आणि गूढ असावी; परंतु आमची घटना थोडक्यांत नाहीं आणि गूढहि नाहीं असें मला वाटतें.

ही राज्यघटना लवचिक आहे. तींत विकासाची सोय आहे. ती लोकशाहीप्रधान आहे; कारण तिचें भवितव्य जनमतावर अवलंबून आहे आणि जनतेचे प्रतिनिधी घटनेंत स्पष्ट केलेल्या उद्दिष्टांनुसार तरतुदीप्रमाणें तिला वळण लावूं शकतात किंवा तींत बदल घडवून आणूं शकतात. आम्हीं जर घटनात्मक मार्ग सोडून हिंसेचा स्वीकार केला, जर एखाद्या अल्पसंख्य जमातीनें सत्ता हस्तगत केली, प्रस्थापित सरकार उलथून दिलें आणि प्रौढ मतदानाच्या पायावर जनतेनें निवडलेल्या प्रतिनिधींच्या मताविरुद्ध निराळी राज्यघटना लादली तर याचा अर्थ असा कीं, आम्हीं लोकशाही रद्द केली असून हुकुमशाहीला मान्यता दिली आहे.

राजकीय हक्कांना आर्थिक हक्कांची जोड देण्याची आवश्यकता आज फार मोठ्या प्रमाणांत आग्रहपूर्वक प्रतिपादिली जाते. ही प्रगति, अगदीं स्पष्ट मर्यादा आंखून दिलेल्या अभिजात उदारमतवादी लोकशाहीच्या क्षेत्रापासून तों आधुनिक अशा सामाजिक आणि आर्थिक प्रश्नांच्या पूर्वनियोजित लोकहितैषी राज्या-( Welfare State )-पर्यंत राज्याचें जें कार्य वाढलें आहे त्यामुळें झाली आहे. हा विशेष, केवळ राजकीय हक्कांची ज्या वेळीं सामाजिक आणि आर्थिक हक्कांपासून फारकत होते त्या वेळीं ते हक्क औपचारिक ठरतात, असें घोषित करणाऱ्या रशियन पद्धतीचाच आहे असें नव्हे. प्रे. रूझवेल्ट यांनीं चार स्वातंत्र्यांसंबंधीं मांडलेल्या निवेदनांतहि आर्थिक विवरण केल्यामुळें हक्काच्या कल्पनेचा विस्तार झाला आहे. गरजेपासून मुक्तता लाभणें ( Freedom from Want ) हा एक आर्थिक हक्क आहे. संयुक्त राष्ट्रसंघाच्या जनरल असेंब्लीनें १० डिसेंबर १९४८ रोजीं मानवी हक्कांचा सार्वत्रिक जाहीरनामा ( A Universal Declaration of Human Rights ) मंजूर केला आहे. त्यांत कलम २३ मधील पहिल्या पोटकलमांत म्हटलें आहे कीं, " प्रत्येकाला काम करण्याचा, कामाची मनाप्रमाणें निवड करण्याचा, त्याचप्रमाणें कामाच्या

---

१ मद्रास येथील ' हिंदु ' या इंग्रजी दैनिकाच्या ' गणराज्य-विशेषांकां 'त आलेल्या ' Economic rights of common man : First Care of the State ' या लेखाचा हा अनुवाद आहे.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## व्यक्तिमात्राचे आर्थिक हक्क

न्याय्य आणि इष्ट किंवा स्वतःला अनुकूल अशा अटी आणि बेकारीपासून संरक्षण मिळविण्याचा हक्क आहे. " बहुतेक सर्व माणसांना जी चिंता वाटते, ती राजकीय असण्यापेक्षां मुख्यतः सामाजिक आणि आर्थिक आहे. राजकीय स्वातंत्र्य हें केवळ उत्तम जीवन मिळविण्याचें एक साधन आहे. काम, जीवनवेतन, कमींत कमी शिक्षण मिळविण्याचा हक्क, बाल्य, वार्धक्य आणि रुग्णावस्था या अवस्थांतून योगक्षेमानें राहण्याचा व काळजी घेतली जाण्याचा हक्क—हे सर्व हक्क सामान्य व्यक्तिमात्राला भाषण-स्वातंत्र्य, सभास्वातंत्र्य किंवा मतदानाचा हक्क यापेक्षां अधिक महत्त्वाचे वाटतात. भाषण-स्वातंत्र्य सभा स्वातंत्र्य आणि मतदानाचा हक्क यासाठीं मिळविण्यांत येतात कीं, तीं सर्व आर्थिक हक्क मिळविण्याचीं साधनें आहेत.

### काम हें कर्तव्य

आपण जोंपर्यंत उत्पादनाचें उच्च मान संपादन करूं शकत नाहीं तोंपर्यंत सामाजिक आणि आर्थिक स्वातंत्र्याचें मान उच्च ठेवणें अशक्य आहे. नागरिकांची गरजेपासून मुक्तता करून त्यांना संरक्षणाची हमी द्यावयाची असेल तर सध्यां अस्तित्वांत असलेल्या उत्पादनसाधनांचा योग्य उपयोग करण्यासाठीं त्यांनीं काम करावें अशी अपेक्षा करणें भाग पडतें. कारण कामाशिवाय गरजेपासून मुक्त होण्याची आकांक्षा म्हणजे केवळ एक भ्रम ठरेल. व्यक्तिमात्राच्या विशिष्ट आर्थिक हक्कांचें संरक्षण आम्हांस करावयाचें असेल तर उत्पादन वाढविण्यास आवश्यक अशा विशिष्ट बंधनांना व्यक्तीनें मान्यता दिली पाहिजे.

याचा अर्थ जबरदस्तीनें काम करायला लावणें, हा नव्हे. सामाजिक क्षेत्रांत आपापलें काम निवडण्याचें कामगारांना स्वातंत्र्य असावें. व्यक्तींशीं परस्परसंबंध ठेवण्याच्या स्वातंत्र्याबरोबरच संपूर्ण विचार—आणि उच्चार—स्वातंत्र्याचाहि त्यांना लाभ मिळाला पाहिजे. कामगारांना आपल्या अधिकाऱ्यांच्या पूर्णपणें अधीन रहावें लागत असेल, त्यांना परस्पर—संघटित होणें अशक्य असेल, तर त्यांना स्वातंत्र्य नाहीं असें निश्चित समजा ! हुकुमशाही व्यवस्थेंत राज्याच्या हितासाठीं कामगारांच्या पिळवणुकीला संघटित करण्याची वृत्ति असते. समाजाच्या गरजांशीं कामगारांच्या स्वातंत्र्याची एकवाक्यता करण्याचा आपला प्रयत्न असला पाहिजे.

आमची आर्थिक व्यवस्था आज अस्थिर आहे. उद्योगधंद्यांत आणि कृषिव्यवसायांत आमची गति खुंटल्यामुळें आम्ही सामाजिक अरिष्टाच्या कड्यावरून खालीं कोसळण्याच्या बेतांत आहोंत. आमची उत्पादनक्षमता अत्यंत निकृष्ट असून जी कांहीं संपत्ति आहे. ती सर्व मूठभर लोकांच्या हातांत केंद्रित झालेली आहे. या प्रचंड आर्थिक विषमतेनें सार्वत्रिक असंतोष निर्माण केला असून हा असंतोष म्हणजे उत्पाती प्रचाराला खुलें आमंत्रणच होय ! घटनेंत नमूद केलेल्या नागरिकस्वातंत्र्याचें रक्षण करावयाचें असेल तर अद्ययावत् यांत्रिक उत्पादनमार्गांनीं संपत्तीची समान वांटणी करण्याच्या भूमिकेवर काम करण्याचें धोरण स्वीकारून आपल्याला जीवनमान वाढविलें पाहिजे. या सर्वांचा अर्थ असा कीं, कृषिकायद्यांत कडक सुधारणा आणि आर्थिक नियोजन हीं करावीं लागतील. कांहीं मूठभर लोकांना जनतेच्या व्यापक हितासाठीं आपल्या हक्कांना तिलांजलि द्यावी लागेल. आणि आपल्या देशांत शांततापूर्वक बदल घडवून आणण्याच्या विशिष्ट परंपरेनुसार संपत्तीची अशी वांटणी करणें विशेष कठिण जाणार नाहीं.

आम्ही जर आर्थिक सुधारणेचें धाडसी धोरण स्वीकारलें नाहीं, तर आपला देश आपणांवर पारतंत्र्य ओढवून घेईल ! सार्वजनिक संस्थांवर खासगी नियंत्रण असणें यत्किंचितहि न्याय्य ठरणार नाहीं. हा बदल स्वयंप्रेरित करारानें आणि सहकार्यानें, मालक, व्यवस्थापक आणि कामगार या संबंधी पक्षांत व्हावा यासाठीं आम्ही उत्सुक आहोंत ! सध्यांच्या मालकी हक्कांच्या कायद्यांत धार्मिक आदरयुक्त भीति वाटण्यासारखें कांहींहि नाहीं. मालकी हक्क, मुक्त व्यापार आणि नफ्याचा हेतु कायम ठेवून अमेरिकेनें आपलें उच्च जीवनमान संपादन केलें आहे, तर सोव्हिएट रशियानें सर्व उत्पादनसाधनांवर सार्वजनिक मालकी प्रस्थापित करून, नफ्याचा हेतु नष्ट करून, आर्थिक नियोजन व विकासास आवश्यक असणारें विज्ञानसंशोधन आणि इंजिनिअरिंग





अनुक्रमणिका

मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

यांच्या साहाय्यानें तीस वर्षांत गुलाम आणि कृषि-प्रधान अशा एका राष्ट्राचा अणुस्फोटक निर्माण करणाऱ्या राष्ट्रांत बदल घडवून आणला आहे. या करितां, औद्योगिक विकासासाठीं जर कांहीं आवश्यक असेल, तर तें मुक्त व्यापार किंवा आर्थिक नियोजन नसून शेती आणि उद्योगधंद्यांत यांत्रिक ज्ञानाचा उपयोग करून घेणें हें आहे. अर्थातच दुसऱ्याच्या श्रमांतून नफा कमावणें कांहीं नैतिक समजतां येणार नाहीं हें निःसंशय ! आपली विशिष्ट परिस्थिति विचारांत घेऊन, आपलें उत्पादन वाढेल आणि योग्य वांटप करतां येईल अशी अर्थव्यवस्था आपल्याला योजावयाची आहे.

## आध्यात्मिक पुनरुज्जीवन

राजकीय स्वातंत्र्य म्हणजे केवळ आर्थिक सुस्थितीचा मार्ग खुला होणें नव्हे तर त्यामुळें आत्मिक पुनरुज्जीवनाचाहि मार्ग खुला होतो. आम्हांला आमचें मन मुक्त करण्यासाठीं आमच्या परंपरेचें संशोधन आणि मूलभूत तात्त्विक पद्धतीवर तिला वळण लावण्याचें कार्य करावयाचें आहे. लोकशाहीचा उद्देश केवळ एक प्रातिनिधिक सरकार मिळविण्याच्या दृष्टीनें साधा राजकीय नव्हे; वा प्रत्येकासाठीं समान संधि मिळविण्याच्या दृष्टीनें आर्थिकहि नव्हे; किंवा अस्पृश्यता आणि उच्च जातीय हक्क नष्ट करण्याच्या अर्थानें सामाजिकहि नव्हे; तर तो मुख्यतः नैतिक आणि धार्मिक आहे. कारण हा नैतिक आणि धार्मिक उद्देशच मानवाला गांजून सोडणाऱ्या सर्व आर्थिक आणि सामाजिक यंत्रव्यवस्थेपेक्षां मानवाचें व्यक्तित्व श्रेष्ठ असल्याचें निश्चित प्रतिपादन करतो. भारतानें तर आदिकालापासून मानवी व्यक्तित्वाचें उच्चत्व आणि श्रेष्ठत्व प्रतिज्ञापूर्वक प्रतिपादिलें आहे. या भूतलावर मानवापेक्षां कांहींहि अधिक श्रेष्ठ नाहीं असें महाभारतांत स्पष्टच सांगितलें आहे :

गुह्यम् ब्रह्म तद् इदम् यद् ब्रवीमि
न मनुष्यात् श्रेष्ठतरं हि किंचित् ॥

आत्म्याचें सर्वव्यापकत्व, प्रत्येक मानवाला परमेश्वराची अंतिम सिद्धि मिळविण्याची संभाव्यता या कल्पना केवळ तत्त्वज्ञांच्या चिंतनापुरत्या किंवा गूढवादी जनांच्या अनुभवाइतक्या मर्यादित नसून त्यावर सर्व सामान्य जनतेचा परंपरेनें किंवा उपजतच विश्वास आहे. अगदीं सामान्य भारतीयाच्या मनालाहि अत्यंत जिव्हाळ्याचा असा हा विषय होय. आमची घटना ज्या आधारावर उभी आहे तीं पायाभूत लोकशाहीचीं मूल्यें आमच्या संस्कृतीचीं अंतिम तत्त्वें होत.

कोणत्याहि स्वतंत्र समाजांत प्रत्येक मनुष्यप्राण्याविषयीं आदरभावना हीच सर्व मानवी व्यवहारांत प्रभावी झाली पाहिजे. हुकूमशहाच्या वर्चस्वाखालील राजकीय जीवन किंवा औद्योगिक हुकूमशाहीखालील आर्थिक जीवन हें नागरिकस्वातंत्र्याला पोषक नाहीं. लोकशाही समाजांत धर्मवेडेपणा असतां कामा नये; पंथपूजा असतां कामा नये; प्रत्येक व्यक्तीला शंका घेण्याचें, चुका करण्याचें, संशोधन आणि प्रयोग करण्याचें, कोणाच्याहि अरेरावीला विरोध करण्याचें स्वातंत्र्य असलें पाहिजे. मग ती अरेरावी वाङ्मयांतील, विज्ञानांतील, तत्त्वज्ञानांतील वा धर्मांतील—कोठलीहि असो !

राष्ट्र आपल्या विशिष्ट जीवनानें जगाच्या संपन्नतेला हातभार लावूं शकतें, इतक्याच मर्यादित क्षेत्रांत राष्ट्रवादाचें समर्थन करतां येईल. जर भारतीय राष्ट्रानें आपली पृथगात्म सांस्कृतिक पद्धति गमावून अमेरिकन किंवा रशियन जीवनपद्धतीचें अनुकरण केलें किंवा तिची प्रतिकृति निर्माण केली तर ती इतर कांहींहि बनूं शकेल; परंतु भारतीय मात्र असणार नाहीं. आमचें दारिद्र्य, रोगराई, अज्ञान आणि इतरत्र कोठेंहि आढळणार नाहीं अशी आमची भौतिक परिस्थिति हीं सर्व असलीं तरीहि आम्ही आमची आध्यात्मिक शक्ति अशी रक्षण केली आहे कीं यांत्रिक संस्कृतीच्या फाजील ओझ्याखालीं वांकून गेलेल्या गृहीततत्त्वांना ती पराभूत करूं शकेल. राजकीय स्वातंत्र्य मिळविल्यावर आपण ती शक्ति फुकट गमावली असें म्हणण्याची पाळी येऊं देऊं नये.

जगाला कांहीं तरी द्यावयाचें आहे असा आम्हांला विश्वास वाटतो. यासाठीं आमचा राष्ट्रवाद समर्थनीय ठरेल. संयुक्त राष्ट्रसंघाच्या चौकटींत, शांततेसाठीं, आम्ही आमच्या राष्ट्रीय अधिसत्तेला बंधन घालण्याइतके नम्र होण्यास तयार आहोंत.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जागतिक संघराज्याचा हेतु साध्य करण्यासाठीं आवश्यक तितकी अधिसत्ता सोडण्यासहि आम्ही तयार होऊं; परंतु आपला राष्ट्रीय स्वभाव, राष्ट्रीय वैशिष्ट्य मात्र आम्ही गमावूं शकत नाहीं.

### आमची खरी कसोटी

आपण आपल्या नव्या राज्यघटनेंत लोकशाहीचीं सर्व मूलभूत तत्त्वें समाविष्ट केलीं आहेत : ( १ ) शिक्षण आणि काम यांच्या बाबतींत सर्वांना समान संधि, ( २ ) जन्म आणि संपत्ति यांच्यावर अधिष्ठित झालेल्या सवलतींचें उच्चाटन, ( ३ ) जातिभेदामुळें उत्पन्न झालेल्या विषमतेचा नायनाट आणि ( ४ ) अस्पृश्यतेचें निर्मूलन—हीं तत्त्वें आपण नव्या राज्यघटनेंत घातलीं आहेत. पण या तत्त्वांच्या केवळ घोषणेमुळें कांहीं जग आपल्याला भलें म्हणणार नाहीं. या केवळ घोषणानुसार आमचें मूल्यमापन केलें जाणार नाहीं; तर हीं तत्त्वें अंमलांत आणण्यासाठीं आपण कोणते व्यावहारिक उपाय योजतों यावर आपली जगांतील प्रतिष्ठा अवलंबून आहे. राज्यघटनेच्या कायदेकानूंत आपण चैतन्य आणि जीवन ओतलें पाहिजे. समाजांत न्यायाची प्रतिष्ठापना होण्यासाठीं अनुकूल परिस्थिति आपण उत्पन्न केली पाहिजे. कारण आपल्या समाजाचा खरा आजार सामाजिक अन्याय, सामाजिक विषमता हा आहे. जर तो आजार आपण दुरुस्त केला, तरच आपण जगूं; नाहीं तर आपण मरून जाऊं! आपले पुढारी आज जे करीत आहेत त्याबद्दल तर ते जबाबदार धरले जातीलच; पण जें करीत नाहींत त्याबद्दलहि ते जबाबदार धरले जातील. जर या दौर्बल्याच्या क्षणीं आम्ही धैर्य दाखविलें नाहीं तर आमच्यावर अशी परिस्थिति येईल कीं, रक्त नि अश्रू यांनींही तिचें परिमार्जन होऊं शकणार नाहीं! कांहीं अवास्तव कल्पनांचें फाजील स्तोम माजविल्यामुळें, आमचे कांहीं सद्गुण हीन दर्जाला पोंचल्यामुळें आणि सचोटीवर तुळशीपत्र ठेवून लोकप्रियतेच्या मागें लागल्यामुळें आम्ही आज शरपंजरी पडलों आहोंत. आमचे कांहीं राज्यकर्ते आम्हांस फ्रेंच क्रांतिकारकांची आठवण करून देतात, जे असें म्हणत कीं "सडकेवर जमाव खडा आहे; ते सर्व लोक कुठे जात आहेत याचा मीं शोध लावलाच पाहिजे; कारण मी त्यांचा पुढारी आहें."

आमच्या पुढाऱ्यांनीं स्वार्थी संधिसाधुपणा, द्वेष आणि आमच्या कामगारांत आढळणारी सार्वजनिक हिताविषयींची अनास्था यांबद्दल वारंवार खेद व्यक्त केला आहे. आम्हांला आतां केवळ वरच्या श्रेणींत थोडेसे पुढारी नको आहेत, तर सर्वच श्रेणींत प्रचंड संख्येंत, ज्यांना स्वतःचें असें हित नाहीं, जे आपल्या भावी जीवनाचा आणि जीवनहेतूंचा समाजाच्या कल्याणासाठीं त्याग करावयास तयार आहेत, असे निःस्वार्थी पुढारी हवेत. आम्ही जर निःस्वार्थी नसूं, आमच्या वैयक्तिक जीवनांतील धोक्यांकडेच आम्ही आपलें लक्ष केंद्रित करूं, तर आमची दृष्टि कलुषित होऊन आम्हांला आमच्या सदसद्विवेकबुद्ध्यनुसार वागण्याचें धैर्य रहाणार नाहीं. जसा वारा वाहत आहे त्याप्रमाणें त्याच्या अधीन रहावें लागेल. निःस्वार्थी आणि विशिष्ट तत्त्वानुसार वागणाऱ्या व्यक्तींच्या अस्तित्वामुळें आमचें सार्वजनिक जीवन शुद्ध होण्यास मदत होईल. या पवित्र दिनीं पेरिक्लिसच्या स्मशान-वक्तव्या—( Funeral Oration of Pericles )-ला थुसीडिडस यानें जो अत्यंत शहाणपणाचा इषारा जोडला आहे त्याचें आपण स्मरण करूं या कीं, "**आमच्या शत्रूंच्या विरोधी डावपेचांपेक्षां मीं आपल्याच चुकांना विशेष भितों !**" ( I fear our mistakes far more than the strategy of our enemies. )

---








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नवीन साहित्य

## भावीण (कादंबरी)—श्री. बा. भ. बोरकर (कांटिनेंटल प्रकाशन, १९६/१९ सदाशिव, पुणें २, १९५०, पानें १९५, किं. ४ रु.)

कवि बा. भ. बोरकर यांच्या 'भावीण' या कादंबरीला यंदाच्या गोमंतक-साहित्यसंमेलनांत 'सुवर्ण-पदक' मिळून ती मोठ्या गौरवास पात्र झाल्याचें वाचकांना विदित असेलच. या वैशिष्ट्यपूर्ण कादंबरीचें, आचार्य दादा धर्माधिकारी यांनीं केलेलें मार्मिक गुणग्रहण पुढें दिलें आहे. हें गुणग्रहण आ. धर्माधिकारी यांनीं श्री. बोरकर यांच्याकडे पत्ररूपानें पाठविलें, त्याच स्वरूपांत तें खालीं समग्र उद्धृत केलें आहे. हें पत्र 'नवभारतां'त प्रसिद्ध करण्याकरितां दिल्याबद्दल आम्ही दोघांचेहि आभारी आहोंत.

"...तुम्ही अगत्यपूर्वक व स्नेहपूर्वक पाठविलेली तुमची कादंबरी 'भावीण' मोठ्या आस्थेनें लक्ष-पूर्वक वाचली. मी इंग्रजी कादंबऱ्याच अनेक वाचल्या आहेत. अजूनहि एखादे वेळीं वाचतों. तरी पण एकंदरींत कादंबऱ्या फारच कमी प्रमाणांत वाचतों. अर्थात् तुमची कादंबरी ही बऱ्याच दिवसांनंतर वाचलेली कादंबरी होय.

"मला कादंबरीचें शास्त्र व तंत्र यांपैकीं कांहींच कळत नाहीं. पण तुमच्या कादंबरीचा माझ्या मनावर एकंदरींत चांगला ठसा उमटला. अहर्निश देवळाच्या गाभाऱ्यांत राहून देवपूजेचा व्यवसाय करून पावित्र्याचा तोरा मिरविणाऱ्या पुजाऱ्यापेक्षां देवळामध्यें झाडलोट करणाऱ्या, अमंगळ मानल्या गेलेल्या भाविणीच्या अंतःकरणांत देवत्व कसें राहूं शकतें हें प्रत्ययाला आणून देणें, तुमच्या कादंबरीचा मुख्य हेतु आहे. भगवंताला आम्ही 'पतितपावन' म्हणतों. समाज ज्यांना पापी व पतित मानतो त्यांच्या अंतःकरणांत प्रवेश केल्यावांचून तो त्यांचा उद्धार कसा करूं शकेल? पतितांचें हृदय हाच जेव्हां त्या अखिल मांगल्याच्या प्रवर्तकाचा देव्हारा बनतो त्याच वेळीं पतितांचें हृदय-परिवर्तन होत असतें. पृथ्वी जेव्हां कर्दमांत गडप होऊन रसातळाला जाऊं लागली तेव्हां तिला उचलून धरण्याकरितां त्या दयाघनानें नित्य घाणींत वावरणाऱ्या शूकराचें रूपदेखील घ्यायला कमी केलें नाहीं. ईश्वरनिष्ठांच्या आस्तिकतेची ही खूण आहे. समाजांतील जे वर्ग व ज्या व्यक्ती हीन, दीन, दलित व शोषित आहेत, त्यांच्याच ठिकाणीं नव्हे तर पापी, पतित व अपावन वर्गांत आणि व्यक्तींतहि ईश्वरी गुणांचा निवास असतो हें सत्य मनाला पटल्यावांचून सामाजिक उत्थान अशक्य आहे. तुमच्या कादंबरींतील शेवंती ही शांताची वास्तविक कांचोळी आहे. तिच्या हृदयांतील दैवी गुणांची दीप्ति तुम्ही मोठ्या नाजुकपणें व कौशल्यानें प्रकट केली आहे. तुमची शेवंती मराठी वाचकांना चिरस्मरणीय वाटेल.

"टॉमस हार्डीनें 'टेस'ला 'ए प्युअर वूमन' म्हटलें आहे आणि 'मेयर ऑफ् कॅस्टरब्रिजला' 'मॅन ऑफ् कॅरक्टर' म्हटलें आहे. विषम परि-स्थितींत जन्माला येऊन मोह, आमिष व सामाजिक दडपण यांना तोंड देत देत ज्या व्यक्ती मानवतेची चढण चढतात त्यांच्याच ठिकाणीं यथार्थ शीलाचा विकास होत असतो. अहल्या, द्रौपदी, सीता,








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आणि तारा या प्रातःस्मरणीय साध्वी स्त्रिया म्हणून पूजिल्या जातात. त्यांच्यापैकीं प्रत्येकीच्या शीलावर कुठला तरी आरोप, आक्षेप किंवा अपवाद आलेला होता. प्रतिकूलतेंतहि ज्यांनीं आपलें सत्त्व सोडलें नाहीं त्याच धन्य झाल्या. त्याच धन्य आहेत. म्हणूनच तुमच्या शेवंतीविषयीं विलक्षण आदरभाव वाटायला लागतो.

" तुमच्या कादंबरींत सृष्टिवर्णनाचा पाल्हाळ नाहीं. भाषेची रसिकाला खुपणारी भपकेदार कलाकुसर नाहीं. आणि फाजिल पांडित्यप्रदर्शनहि नाहीं. गोव्यांतील सृष्टिसौंदर्याचें आणि सामाजिक दृश्यांचें तुमचें चित्रण मोठें हृदयंगम व आकर्षक आहे. तुमची भाषा भावपरिपोषाला व रसपरिपोषाला अनुरूप अशीच अलंकारविभूषित व सूचकहि आहे. मधूनमधून तुम्ही झोंकदार, मार्मिक व गोंडस सिद्धान्तवाक्यांचे जे सर सोडून दिलेले आहेत ते मोठे मोहक आहेत.

" तुमच्या कादंबरीचें थोडेसें—म्हणजे माझ्या बेताचें—गुणदोषदिग्दर्शन मीं केलें असतें; पण ती माझी भूमिका नव्हे, आणि तो माझा अधिकारहि नव्हे. रवळूदादा, रमाक्का, रंजना, केशव आणि अंताशेठ या सर्वांच्या विशिष्ट भूमिकांशीं समरस होऊन, परस्परभिन्नच नव्हे, तर परस्परविरोधी पार्श्वभूमीवर तुम्हीं जो उदात्त रसाचा उठाव केलेला आहे, तो रसिक वाचकाच्या हृदयाची पकड घेतल्यावांचून राहात नाहीं.

" हें पत्र फक्त गुणग्राही दृष्टीनेंच लिहीत आहें. दोष-दर्शनाची वृत्ति आतां फारशी मानवत नाहीं म्हणून क्षमा कराल अशी आशा आहे.

स्नेहाकांक्षी

ता. १४।७।१९५० दादा धर्माधिकारी "

---

## सुश्लोकमेघ

(श्रीकालिदासकृत मेघदूताचा मराठी अनुवाद)— लेखक व प्रकाशक : डॉ. रा. चिं. श्रीखंडे, एम्. बी. बी. एस्., मंगळवार पेठ, कोल्हापूर; (१९५०); मूल्य ४ रु.

'सुश्लोकगोविंद' 'सुश्लोककुमार' व आगामी 'सुश्लोकमानस' यांचे कर्ते डॉ. रा. चिं. श्रीखंडे यांनीं आपल्या 'सुश्लोक'—मालिकेंत 'सुश्लोकमेघा'चें हें नवीन पुष्प गुंफलें आहे. 'सुश्लोकमेघ' या पुस्तकांत प्रत्यक्ष मेघदूताचा श्लोकानुवाद २५ पानें असून, आरंभीं ९२ पानांची विस्तृत प्रस्तावना किंवा 'अवतरणिका' जोडलेली आहे. ही अवतरणिका म्हणजे डॉ. श्रीखंडे यांच्या संस्कृत वाङ्मयावरील गाढ व्यासंगाची, त्यांच्या परम रसिकतेची आणि कालिदासाविषयींच्या त्यांच्या निस्सीम आदरभावनेची साक्ष आहे. कालिदासाच्या 'मेघदूता'नें पौरस्त्य व पाश्चात्य रसिकांवर स्थलकालनिरपेक्ष अशी मोहनी कशी घातली आहे याचें अद्ययावत् सुंदर दर्शन आपणांस या अवतरणिकेवरून होतें. डॉ. श्रीखंडे यांनीं, मेघदूतावरील झालेल्या ५० संस्कृत टीका, मेघदूतानें स्फूर्ति दिलेलीं ३५ संदेशकाव्यें, तसेच मेघदूताचे निरनिराळ्या भाषांतील अनुवाद—' इंग्रजी, ११ हिंदी, ९ गुजराती,




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

२ बंगाली, ३ कन्नड, आणि १० मराठी—अशा 'मेघदूता'नुप्राणित वाङ्मयाचा उल्लेख केला आहे. त्यांपैकीं संस्कृत टीकांमधील पूर्णसरस्वतीकृत 'विद्युल्लता' या टीकेंमधून आणि इंग्रजी, हिंदी, गुजराती या भाषांतील कांहीं अनुवादांमधून थोडे नमुने त्यांनीं दिले आहेत. मराठींतील मात्र सर्वच अनुवादांचे त्यांनीं नमुने दिले असून त्यांचें त्रोटक गुणदोषदिग्दर्शनहि केलें आहे. स्वतःचा मराठी अनुवाद रसिकांपुढें मांडतांना त्याच क्षेत्रांत आतांपर्यंत झालेल्या कामगिरीच्या त्यांनीं केलेल्या—ओझरत्या का होईना—ह्या दिग्दर्शनानें जिज्ञासू वाचकांना अपेक्षापूर्तीचा अंशतः आनंद लाभेल यांत शंका नाहीं. याशिवाय डॉ. श्रीखंडे यांनीं 'मेघदूत' आणि 'वाल्मीकिरामायण' यांतील साम्यस्थळें (३३) साक्षेपानें तपशीलवार दिली असून, भागवत, योगवासिष्ठ आणि तुलसीदास यांतील 'मेघदूता'शीं असलेल्या कांहीं साम्यस्थळांचाहि निर्देश केला आहे.

मेघदूताच्या सर्वश्रेष्ठ काव्यगुणांचें वर्णन करतांना त्यांनीं अनेक पाश्चात्य व पौरस्त्य रसिक पंडितांचे कांहीं उतारे सादर केले आहेत. व त्याच ओघांत मेघदूताच्या सर्वोत्कृष्टतेविषयीं आक्षेप घेणाऱ्या कांहीं महाराष्ट्रीय विद्वानांना उत्तरें देण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. मेघदूताचें उत्कृष्टत्व मान्य करूनहि, ज्या भूमिकेवरून व ज्या पद्धतीनें डॉ. श्रीखंडे यांनीं आक्षेपांचें निरसन केलें आहे, ती त्यांची भूमिका व पद्धति मात्र पटण्यासारखी नाहीं हें नमूद करणें भाग आहे—मात्र एकंदर 'अवतरणिके'संबंधीं बोलावयाचें म्हणजे 'मेघदूता'च्या रसनिर्झरीमध्यें अवगाहन करावयास अवतरण करूं इच्छिणाऱ्या रसिकांस ही 'अवतरणिका' उपकारकच होईल यांत शंका नाहीं.

'मेघदूता'चा अनुवाद डॉ. श्रीखंडे यांनीं उपजातिवृत्तांत केला असून मूळ मन्दाक्रान्ता-वृत्तांतील ११७ श्लोकांचे उपजातिवृत्तांतील २४४ श्लोक झाले आहेत. एका मन्दाक्रान्तेला साधारणतः दोन उपजाती, व कित्येक ठिकाणीं अर्थ पूर्ण करण्याकरितां तीन उपजाती योजिल्या आहेत. अनुवाद मुळाला शक्य तितका कांटेकोरपणें धरून असावा असा अनुवादकांचा कटाक्ष आहे व त्या कटाक्षानुसार त्यांचा हा प्रयत्न चांगलाच यशस्वी झाला आहे; किंबहुना मूळ काव्याचा अनुवाद शक्य तितका मुळाला धरून करणें हाच या अनुवादाचा विशेष म्हणतां येईल. मूळ काव्याशीं तुलना करून पहाणाऱ्यांच्या हा अनुवादाचा विशेष नजरेंत नक्कीच भरेल.

'सुश्लोकमेघा'च्या ह्या वैशिष्ट्याचा निर्देश केल्यावर, प्रसाद, माधुर्य, लालित्य या गुणांच्या दृष्टीनें पाहतां, हा अनुवाद एकंदरींत तितका सरस उतरला नाहीं असें म्हणावेंसें वाटतें. आधीं एका भाषेंतल्या काव्याचा सरस अनुवाद दुसऱ्या भाषेंत उतरवणें हें कठिणच असतें. त्यांत पुन्हां 'मेघदूता'सारख्या नादमधुर, करुणसुन्दर, संस्कृत काव्याचा आशय दुसऱ्या भाषेमध्यें समर्पक व सरस रीतीनें प्रकट करणें हें तर दुष्करच. स्वतः डॉ. श्रीखंडे यांनींच सुचविल्याप्रमाणें, रसिकाला तक्रार करायला नेहमींच जागा रहाणार कीं 'हन्त एकस्मिन् कचित् अपि न ते चंडि सादृश्यम् अस्ति'! अर्थात् रसिकाची ही दुराराध्यता मान्य करूनहि, अनुवादकृतीची सरसनीरसता सापेक्षतेनें वा तारतम्यानेंच मापिली पाहिजे हें खरें. या सापेक्ष दृष्टीनेंहि पाहिलें असतां डॉ. श्रीखंडे यांचा हा मेघदूतानुवाद आधुनिक मराठी वाचकाला तितका हृद्य व आकर्षक वाटण्याइतका उतरला नाहीं. तो मुळाला धरून शब्दशः किंवा वाक्यशः कितीहि अर्थवाही असला तरी त्यांत गोडवा आलेला नाहीं. ज्या संस्कृतज्ञ वाचकांनीं मुळांतील मन्दाक्रान्तावृत्ताची माधुरी चाखली आहे, त्यांना प्रस्तुत अनुवादांत उपयोजिलेल्या उपजातिवृत्ताची निवड तितकीशी हृद्य वाटत नाहीं. डॉ. श्रीखंडे यांनीं पूर्वीं झालेल्या दहा मराठी मेघदूतानुवादांचा परामर्श घेतला आहे. त्यांतील ७ अनुवाद समश्लोकी म्हणजे मंदाक्रान्ता वृत्तांत व बाकीचे तीन मात्रावृत्तांत किंवा जातिवृत्तांत आहेत. प्रत्येक अनुवादकानें अमकें वृत्त कां निवडलें हा ज्याच्या त्याच्या आवडीनिवडीचा व वृत्तरचनेवरील प्रभुत्वाचा प्रश्न आहे. परंतु वाचकाच्या दृष्टीनें पाहतां असें वाटतें कीं, यापूर्वींच्या अनुवादकांचा, मुळांतील वृत्त तेंच ठेवून किंवा दुसरें नादमधुर वृत्त योजून मुळां-



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तील नादमाधुरीचा प्रतिध्वनि उमटविण्याचा प्रयत्न असावा. प्रस्तुत अनुवादांत योजिलेल्या उपजाति-वृत्तानें नादमाधुरीच्या दृष्टीनें प्रथमतःच खटकल्यासारखें वाटतें.

शिवाय, मराठी संस्कृतला कितीहि जवळची असली तरी त्या दोन्ही भाषांची प्रकृति भिन्न आहे. मूळ संस्कृत श्लोकांतील एका डौलदार, सुश्लिष्ट, सामासिक विशेषणाचा मराठींत अर्थ आणायचा तर आपल्याला मराठींत कित्येक वाक्यें उपयोजावीं लागतात. तसा अर्थ मुळाबरहुकूम शब्दशः किंवा वाक्यशः अनुवादांत आणायचा प्रयत्न केला तर आधुनिक मराठीच्या प्रकृतीविरुद्ध बेडौल, मराठी संमिश्र वाक्योपवाक्यें तयार होतात. प्रस्तुत अनुवादांत अशा प्रकारची शिथिल बेडौल वाक्यरचना मधूनमधून आढळते. मूळाशीं ताडून पाहिल्यास, संस्कृतज्ञांना अशा वाक्यरचनेचा उलगडा होतो. पण स्वतंत्रपणें मात्र ती रचना गुंतागुंतीची, बेडौल, दुर्बोध वाटून वाचकाचा विरस होतो. खरोखरी अनुवादाच्या सरसतेचें मुख्य लक्षण हें कीं, ती रचना परोपजीवी न वाटतां, स्वतंत्र कृति म्हणून तिचा आस्वाद घेतां यावा व तिचें रमणीयत्व प्रतीत व्हावें. या दृष्टीनें प्रस्तुत अनुवाद वाचल्यास बऱ्याच ठिकाणीं खटकल्याशिवाय रहात नाहीं. स्थलाभावीं केवळ दोन उदाहरणें खालीं दिलीं आहेत. त्यावरून वरील विधानाची सत्यता अजमावतां येईल.

' मेघदूतम् '—' भर्तुः कंठच्छविरिति ' ( ३३ )

' सुश्लोकमेघ '—

कीं स्वामिकंठासम नील जो तूं
त्या आदरानें गण पाहतात
तैसेच ते गंधवती-नदीचे
वहात अंभोजसुगंधि वात ६८

रता जलक्रीडनिं कामिनी ज्या,
स्नानेंहि त्यांच्या अतिगंध ज्यातें
त्या वायुंनीं डोलति वृक्षवल्ली
उद्यानिंच्या जेथिल, जाइ तेथें ६९

तें धाम चंडीश्वर लोकभर्ता
जो श्रीमहाकाल महेश त्याचें
पावित्र्यही जेथ विमुक्तिकारी
विलासहि लाभति तूज साचे ७०

' मेघदूतम् '–' आलोके ते निपतति इ० ' (८७)

' सुश्लोकमेघ '—

' पडेल ती दृष्टि तुझ्या झणींच
पूजेंत जी गुंगलि भक्तिभावें
किंवा चितारी निजकल्पनेनें
मी जो वियोगें कृशतेसि पावें ' १८३

संबंधी सर्वनामांच्या उपवाक्यांची ही गुंफण मुळांतील रचनेला अर्थाच्या दृष्टीनें जरी निकट असली तरी स्वतंत्रपणें हे श्लोक वाचणाराला वाक्योपवाक्यांची ही फैर दुर्बोधतेला कारणीभूत म्हणून तितकीशी हृद्य वाटत नाहीं.

इतर मराठी अनुवादांची तुलना करून पहायला स्थलकालदृष्ट्या अवकाश नाहीं. तरी पण तुलना म्हणून अगदी अलीकडील म्हणजे गेल्या वर्षीं प्रसिद्ध झालेल्या कुसुमाग्रजांच्या ' मेघदूतानुवादा 'चा येथें निर्देश करतां येईल. डॉ. श्रीखंडे यांनीं आपल्या 'अवतरणिके'त कुसुमाग्रजांच्या अनुवादाचा परामर्श घेतांना केवळ त्यांतील दोषांवर लक्ष केंद्रित करून, त्यांतील गुणांना अन्याय केला आहे असें वाटतें. डॉ. श्रीखंडे यांनीं कुसुमाग्रजांच्या अनुवादांतील दाखविलेले दोष मान्य करूनहि, त्या अनुवादांतील मुख्य गुण जे प्रसाद, माधुर्य, व मराठमोळी रचना ते नजरेंत भरण्यासारखे आहेत. मूळ काव्य घटकाभर दृष्टीआड करून अनुवाद वाचणाराला स्वतंत्रपणेंहि अर्थ ताबडतोब प्रतीत होऊन आह्लाद व्हावा ही जी यशस्वी अनुवादाची उपरिनिर्दिष्ट कसोटी, तिला स्थूल मानानें कुसुमाग्रजांचा अनुवाद उतरण्यासारखा आहे. उदाहरणादाखल म्हणून वर ' सुश्लोकमेघां 'तील जीं उदाहरणें दिलीं आहेत, त्यांनाच मूळ श्लोकांचे समानार्थी असे कुसुमाग्रजांचे पुढील अनुवाद ताडून पहावेत :

मेघदूत ३३

' गंधवतीवर नाहत युवती सुवास चेतोहर
वाहत वारा घेउनि संगें कमलांचे केसर
त्या लहरींसह पावन हो तूं पाहुनि चंडीश्वरा
नीलवर्ण तव पाहुन करतिल शैव तुझा आदर '









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मेघदूत ८७

'दिसेल अथवा पूजन करतां भाविकतेनें सती
चितारीत वा कल्पनेंतली कृश माझी आकृति'

आपला अनुवाद शक्य तों मुळाला धरून असावा याबद्दलचा डॉ. श्रीखंडे यांचा कटाक्षपूर्वक प्रयत्न यशस्वी झाला आहे असें वर म्हटलेंच आहे. कांहीं ठिकाणीं मात्र मुळांतील महत्त्वाचा आशय अनुवादांत आलेला दिसत नाहीं. उदा०— 'स्तिमितनयनप्रेक्षणीया शोभा' (मेघदूत ५९) याबद्दल फक्त 'गिरि दर्शनीय' एवढेंच आहे. 'पराग लोभ्रान्तरिंचे पडोनी त्यांची मुखश्री धवलत्व ल्याली' ह्यांत मुळांतील 'नीता लोध्रप्रसवरजसा पांडुताम् आननश्री :' या पंक्तीचें इंगित उतरलेलें नाहीं. 'स्तोकनम्रा स्तनाभ्याम्' (मेघदूत ८४) याचा 'किंचिन्नता जी कुचकोरकांनीं' असा अनुवाद करून स्पष्ट अर्थहानि झालेली आहे. त्याच श्लोकांतील 'शिखरिदशना' याचा अनुवाद 'शिखराभदन्ता' असा करून त्याचा अर्थ टीपेंत 'पिकलेल्या डाळिंबांतील दाण्याप्रमाणें दांत असणारी' असा सामान्यपणें आढळून न येणारा दिला आहे.

याशिवाय व्याकरणाच्या दृष्टीनें कांहीं ठिकाणीं शैथिल्य आढळून येतें. उ०—'दृढालिंगनलोभि प्रिया' (७), 'जलार्थि हा चातक' (१८), 'गृहबर्हि तुज नृत्य देती' (६६), 'तूझ्या... गर्जनाही' (११८), 'अभ्रावलि वारिवर्षी, (१३३), 'जी रात्र नेली क्षणशीच तीनें' (१९२).

कित्येक ठिकाणीं 'संस्थापुनि आत्मचित्त' (८), 'मृगलोचनेनें नेत्र' (२०४), यांसारखे संस्कृतप्रचुर शब्दप्रयोग, त्याचप्रमाणें 'तो धूम्र, अग्नी, जल, वायु यांचा निर्जीव मेळा' (१०), 'खडकाळ पार्दी' (४०), 'बघोनि तन्व्ही' (७६), 'मुखाची भा कशी दिसावी?' (१८२), 'प्रभातकुंदासम जै ढिलेंचि' (२४०)—यांसारखी संस्कृत-मराठी शब्दांची भेसळ हीं; कशीशींच वाटतात.

डॉ. श्रीखंडे स्वतः अत्यंत विद्वान्, चोखंदळ आणि संस्कृत वाङ्मयांत मुरलेले रसिक असून त्यांची लेखणी अनुवादकार्यांत कसलेली आहे. पण त्यांची अनुवादशैली एका विशिष्ट परंपरेंतील आहे. पांडित्य, मुळांतील आशय कांटेकोरपणें व्यक्त करण्याबद्दलचा ब्रारकावा हा त्या शैलीचा जसा उल्लेखनीय गुण आहे, तसाच सहजता, आधुनिक मराठी भाषेच्या वळणाच्या दृष्टीनें अपेक्षित असें माधुर्य, या गुणांविषयीं आवश्यक त्या आस्थेचा अभाव हा तिचा दोष आहे. यापुढील अनुवाद व्हावयाचे तर त्यांत उपरिनिर्दिष्ट गुण कायम राहून दोष शक्य तितके कमी व्हावयास पाहिजेत. तरच ते अनुवाद मूळ कृतीचें वैभव प्रतिबिंबित करून रसिकांच्या कौतुकादरास अधिक पात्र होतील व अनुवादकांचे श्रम सफल करतील.

—वि. म. बेडेकर

---

## १९८० सालच्या भारतांतील ग्रंथालयसंघटना

ग्रंथालयशास्त्राचे सुप्रसिद्ध तज्ज्ञ डॉ. एस. आर. रंगनाथन् यांनीं "Library Development Plan for India" या आपल्या नवीन पुस्तकांत भारताकरितां पुढील तीस वर्षांसाठीं एक ग्रंथालययोजना मांडली आहे. भारतांत सार्वत्रिक साक्षरताप्रसार व्हायला तीस वर्षें लागतील. या सर्व लोकांना योग्य असें वाचनखाद्य पुरवायला ग्रंथालयांची संघटनाहि वाढली पाहिजे. याला आवश्यक अशा सर्व गोष्टींचा विचार करून डॉ. रंगनाथन् यांनीं आकडेवारी देऊन तपशीलवार विवेचन केलें आहे. त्यांची योजना जर अंमलांत आली, तर १९८० सालीं भारतांतील ३१ कोट लोकांकरितां निरनिराळ्या प्रकारच्या ग्रंथालयांची एकंदर संख्या ७७१८६९ इतकी होईल. हीं ग्रंथालयें चालवायला, त्यांची नीट व्यवस्था ठेवायला, २,८२,४४८ लोकांची जरूरी आहे. याकरितां दर वर्षीं ६६ कोट ९० लक्ष रुपये लागतील.

—'संडे न्यूज ऑफ इंडिआ' (९–७–५०) वरून









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# सारसंकलन

## युसफ मेहेरअल्ली

युसफ मेहेरअल्ली नुकतेच परलोकवासी झाले. पण परलोकवासी झाले असें म्हणण्यापेक्षां इमरसनच्या 'Goodbye, Proud World, I am going home' या शब्दांत त्यांनीं जगाचा निरोप घेतला असें म्हणणें सयुक्तिक होईल.

मेहेरअल्ली हे केवळ विचारानेंच समाजवादी नव्हते. भारतांतील सध्यांची आर्थिक समाजरचना नाहींशी करून त्या ठिकाणीं समाजवादी अर्थरचना आणणें हेंच त्यांचें केवळ ध्येय नव्हतें. ते एक कृतिशील समाजवादी होते. समाजवादी विचारसरणीपेक्षां समाजवादी जीवनमूल्यें अधिक श्रेष्ठ अशी त्यांची भावना होती. आपल्या दैनंदिन राहणींतहि त्यांनीं समाजवादी तत्त्वज्ञान अंमलांत आणलें होतें.

मेहेरअल्ली हे एक पहिल्या दर्जाचे साहित्यिक होते. त्यांचें 'ए ट्रिप टु पाकिस्तान' हें पुस्तक वाङ्मयाचा सुंदर नमुना आहे. तसेंच त्यांनीं लिहिलेल्या 'लीडर्स ऑफ इंडिया' या पुस्तकांत भारतांतील सरदार, राजाजीप्रभृति पुढाऱ्यांची आकर्षक शब्दचित्रें रेखाटण्यांत आलीं आहेत. जगांतील प्रख्यात कलावंत, शिल्पकार, लेखक, मुत्सद्दी त्यांचे मित्र होते. त्यांच्याकडे अनेक सुंदर कलाकृतींचा संग्रह होता. मेहेरअल्लींची वाचनाची आवड तर सर्वश्रुतच आहे. अनेक अमूल्य ग्रंथांचा त्यांच्याकडे संग्रह असून, जगाच्या अनेक भागांतून ते सतत पुस्तकें व मासिकें मागवीत. ते नेहमींच सपाटून वाचनावाचीत असत व आजारी असतांना तर ते वाचनावरच जगत असें म्हटल्यास मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं. पण मेहेरअल्लींचा समाजवादी दृष्टिकोन त्यांच्या साहित्यिक बाण्यांत उतरला होता. त्यांचा ग्रंथसंग्रह म्हणजे एक फिरती लायब्ररी होती. तुरुंगामध्यें असतांना स्वतः मागविलेलीं पुस्तकें ते स्वैरपणें सर्वांना वाचावयास देत. मेहेरअल्लींची ही कीर्ति ऐकून त्यांच्याकडे भारतांतून अनेक ठिकाणांहून पुस्तकांच्या मागण्या येत आणि मेहेर-अल्ली या मागण्या पुरवीत असत. गांधीजींनीं तुरुंगाला पावित्र्य आणले होतें, असें डॉ. जयकर एके ठिकाणीं बोलतांना म्हणाले होते. मेहेरअल्लींच्या बाबतींत असें म्हणतां येईल कीं तुरुंग म्हणजे त्यांनीं वाचनालय करून टाकलें होतें. मेहेरअल्ली म्हणजे एक चालतेंबोलतें विद्यापीठ होते.

मेहेरअल्ली हे उत्कृष्ट वक्ते होते. विशेषतः इंग्रजीवर त्यांचें चांगलेंच प्रभुत्व होतें. त्यांची भाषा ओजस्वी व वाणी खेळकर होती. त्यांचा खिलाडूपणा अभिजात होता. पुण्याच्या सन १९४० च्या अखिल-भारतीय-कॉंग्रेस-कमिटींत राजाजींनीं राष्ट्रीय सरकार स्वीकारण्याचा ठराव आणला होता. मेहेरअल्लीनीं या ठरावावर बोलतांना, राजाजींना पळून चाललेल्या इटालिअन जहाजांची उपमा दिली. राजाजींनीं मेहेरअल्लींची ही उपमा त्यांच्यावर उलटविली. राजाजी म्हणाले; "माझे तरुण मित्र मि. मेहेरअल्ली यांनीं मला पळून चाललेल्या इटालिअन जहाजाची उपमा दिली. पण आजच इटालियन जहाजें भूमध्य समुद्रांत आल्याची वार्ता आली आहे, इकडे त्यांनीं लक्ष द्यावें." राजाजींची ही प्रतिकोटी मेहेरअल्लींना मनापासून आवडली. राजाजींसारखा उत्कृष्ट वक्ता नाहीं असें नंतर केलेल्या एका भाषणांत त्यांनीं मनःपूर्वक उद्गार काढले.

त्यांच्याबद्दल एकाच वाक्यांत सांगावयाचें म्हणजे त्याचें डोकें अप्रतिम संघटकाचें होतें, हृदय कवीचें होतें आणि वाणी पट्टीच्या वक्त्याची होती. आपल्या 'ए ट्रिप टु पाकिस्तान' या पुस्तकाच्या एका प्रकरणांत त्यांनीं प्रख्यात कवि इक्बाल याचें पुढील



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

वचन उद्‌धृत केलें आहे :

" The pith of life is contained in action.

To delight in creation is the law of life.

Arise and create a new world !"

मेहेरअली आजन्म याचकरितां झगडले नाहींत काय ?

— शं. ल. चिटणीस

## स्व. स्वामी भवानीदयाल संन्यासी

गेल्या मे महिन्याच्या ९ तारखेस भवानीदयाल संन्यासी यांचें अजमेर मुक्कामीं देहावसान झालें. स्वामीजी गांधीजींचे आफ्रिकेंतील एक प्रमुख सहकारी होते. त्यांनीं तेथील सत्याग्रहांत भाग घेतला होता. कारावासांतून परत आल्यावर मोठ्या कर्तबगारीनें " इंडियन ओपिनियन " या गांधीजींच्या वर्तमानपत्राचें त्यांनीं संपादन केलें.

त्यांच्या जीवनकार्याचा परिचय करून देणारा एक लेख ' जीवनसाहित्य ' या हिंदी मासिकाच्या जून १९५० च्या अंकांत आला आहे. त्यावरून पुढील माहिती दिली आहे.

आपल्या आफ्रिकेंतील जीवनाबद्दल स्वामीजी आपल्या " प्रवासीकी आत्मकथा "मध्यें लिहितात :

" दरअसल मैं हिंदुस्थान से निर्धन होकर गया था—दक्षिण अफ्रिका में रोजगार-धंधा करने और धनवान् होकर भोगविलास की सामग्री जुटाने तथा आमोद-प्रमोदमय जीवन बिताने के अभिप्राय से; परंतु बापू के दर्शन और सत्संग से मेरे जीवन का नक्शा ही बदल गया ! मेरे हृदय में एक ऐसी दैवी प्रेरणा हुई कि मैंने प्रवासी भारतीयोंकी सेवा में आत्मोत्सर्ग करने का संकल्प कर लिया ! "

ज्या थोड्या व्यक्तींनीं भारताबाहेरील भारतीयांच्या सेवेचें व्रत घेऊन तें अंतसमयापर्यंत अचलपणें पाळलें अशांपैकीं स्वामीजी एक होते. त्यांची या कामांतील एकाग्रता, निष्ठा व मेहनतीपणा हीं खरोखरच अतुलनीय म्हटलीं पाहिजेत. आपल्या आयुष्याचा बहुतेक भाग आफ्रिकेंत वेंचून ते नऊदहा वर्षांपूर्वीं हिंदुस्थानांत आले व अजमेरला राहिले. तेथें त्यांनीं " प्रवासी-भवन " स्थापिलें आणि " प्रवासी " नामक मासिकपत्र चालविलें. शरीर थकत असतां बहुतेक लोक विश्रांतीचीच अपेक्षा करतात. पण स्वामीजींनीं आपलें काम निरंतर चालू ठेवलें होतें. साहित्य, समाज, राजनीति अशा कोणत्याहि क्षेत्रांत भारताबाहेरील हिंदवासीयांच्या सेवेची संधि आली कीं त्यांनीं ती साधलीच समजावी. त्यांनीं आपल्या आयुष्यांत अनेक प्रकारचे कष्ट सोसले, तुरुंगवास पत्करला; पण आपल्या कार्यापासून ते कधींहि विचलित झाले नाहींत. त्यांची ही सेवापरायण व कार्यप्रवण वृत्ति भारतीयांना प्रोत्साहनदायी होवो.

## इंग्रजी मासिकांचें इच्छामरण

चांगल्या अभिरुचीचें साहित्य प्रकाशित करणाऱ्या मासिकांना जिवंत राहतां येणें अशक्य आहे हा मराठींतील मासिकांचाच अनुभव आहे असें नाहीं. गेल्या महायुद्धानंतर जीं कांहीं परिवर्तनें घडून आलीं त्यांत या अभिरुचीच्या परिवर्तनालाहि स्थान आहे. या परिवर्तनाचे ताजे बळी म्हणजे इंग्लंडमधील " स्ट्रँड " आणि " लाइफ ॲन्ड लेटर्स " हीं मासिकें होत. " स्ट्रँड " मासिकाचे नांव सर्व इंग्रजी जाणणारांच्या परिचयाचें होतें. तें मनोरंजक पण उत्कृष्ट कथावाङ्मयाचें मासिक म्हणून ओळखलें जाई. त्याच्या लेखकवर्गांत रुड्यार्ड किपलिंग, एच्. जी. वेल्स, पी. जी. वोडहाउस वगैरेसारखे लेखक होते. पण अशा मासिकालाहि प्रकाशन बंद करावें असें वाटण्यासारखी परिस्थिति यावी हा दैवदुर्विलासच म्हटला पाहिजे. "स्ट्रॅन्ड" च्या प्रकाशकांना या मासिकांतून आतां पूर्वींसारखा फायदा होत नव्हता हा त्याचा व्यावहारिक अर्थ हें खरें; पण प्रकाशक आपल्या मासिकाच्या मार्चच्या शेवटच्या अकांत म्हणतात तेंहि खरेंच असलें पाहिजे कीं त्यांना पूर्वींची परंपरा व आकार टिकवून मासिक चालविणें अशक्य झालें; आणि कांहीं तरी नवीन प्रयोग करीत मासिक चालवण्यापेक्षां त्याच्या वैभवशाली जीवनास पूर्णविराम देणें उत्तम वाटून त्यांनीं तें बंद केलें.

" लाइफ ॲन्ड लेटर्स "ची परंपरा साहित्यदृष्ट्या फारच महत्त्वाची होती. पूर्वींचें प्रसिद्ध









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

" बुकमन " हें इंग्रजी नियतकालिक बंद होऊन " लंडन मर्क्यूरी " नांवाच्या उत्कृष्ट नवीन मासिकांत तें विलीन झालें. " लंडन मर्क्यूरी " हें मासिक म्हणजे इंग्रजी साहित्यांतील उज्ज्वल निर्मिति होतें. तें मासिक या " लाइफ् ॲन्ड् लेटर्स " मध्यें सामावलें गेलें. " लाइफ् ॲन्ड् लेटर्स " चें संपादन अतिशय कुशलतेनें चाललें होतें. निरनिराळ्या प्रकारें उच्च अभिरुचीच्या साहित्याच्या निर्मितीला तें साहाय्य करीत होतें. त्या मासिकानें चिनी, हिंदी, इटॅलियन, स्वीडिश, इराणी आणि नॉर्वेजियन लेखकांच्या साहित्याचे विशेषांक प्रसिद्ध केले.

" लाइफ ॲन्ड लेटर्स "च्या जूनच्या (शेवटच्या) अंकांत संपादकांनीं आपल्या निर्णयाविषयीं एक स्फुट लिहिलें आहे. त्यांत ते म्हणतात :

" वाढता खर्च हें कारण आहेच, आणि तो किती वाढत जाईल याला सुमारच राहिलेला नाहीं; उलट अशा प्रकारच्या (गंभीर व चर्चात्मक) मासिकाचा प्रसार एका विशिष्ट मर्यादेपेक्षां जास्त होणें संभवनीय नाहीं. आणि जमा-खर्चांतील हें खिंडार भरून काढण्यासाठीं किंमत वाढविणेंहि शक्य नाहीं. कारण ज्यांच्या हातीं हें मासिक पडावें म्हणून आमची धडपड त्यांपैकीं कित्येकांना तें बंद करावें लागून आमचा संबंध तुटेल.

" तेव्हां हें बंद करतांना होणाऱ्या दुःखापेक्षांहि हें मासिक पंधरा वर्षें चाललें या घटनेचें अधिक नवल वाटतें. यापूर्वींच आम्हांला ते बंद करावें लागलें नाहीं याचेंच आश्चर्य करावेंसें वाटतें. मध्यंतरीं पंधरा वर्षें अस्वस्थतेचीं गेलीं. युद्धें, ' थंड युद्धें ', आणि ' ज्ञानतंतूंच्या ताणाचीं युद्धें ' झालीं. सिंहासनावरून राजाची पदच्युति झाली, अनेक निवडणुका झाल्या, बंधनें आलीं, हुकमी राजवट आणि प्रतिक्रिया जाणवल्या...पण या भूतकालाची रडकथा पुढें चालविण्यांत अर्थ नाहीं... "

इंग्रजी मासिकांवरहि इच्छामरणाची पाळी आलेली पाहून उत्तम मराठी मासिकांच्या भवितव्याबद्दल मनांत आशंका येऊं लागणें अपरिहार्य आहे !

" कोन-टिकी " संशोधन-सफर

कांहीं शतकांपूर्वींची नव्हे, तर कांहीं वर्षांपूर्वींची, दुसऱ्या महायुद्धानंतरची ही साहसकथा आहे. सहा माणसें आणि एक पोपट. एका तराफ्या- (raft) वर बसून महासागरांत दीर्घ सहलीला निघाले. पेरु देशाच्या किनाऱ्यापासून निघून ते साउथ सी बेटांच्या रोखानें, हम्बोल्ट प्रवाहाच्या अनुरोधानें निघाले. हें अंतर ४३५० सागरी मैल आहे. तराफा मोठ्या नऊ ओंडक्यांचा बनविलेला होता; व त्यावर आसऱ्याची जागा म्हणजे बांबूच्या कामट्या बांधून केलेलें एक केबिन. व तेंहि अर्धवट उघडें ! या केबिनमध्यें तीं सहा माणसें १०१ दिवस राहिलीं. तराफ्याला एक चौकोनी शीड जोडलेलें होतें आणि सुकाणूंहि होतें. त्यांचा मार्ग जहाजांच्या दळणवळणापासून दूर होता आणि त्यांच्यापैकीं फक्त एकालाच दर्यावर्दी जीवनाचा अनुभव होता. या संशोधन सहलीला ' कोन-टिकी ' (Kon-Tiki) असें नांव मिळालें असून तिची सर्व हकीकत आतां ' दि कोन-टिकी एक्स्पीडिशन " या नांवानें प्रसिद्ध झाली आहे. उपरिनिर्दिष्ट " लाइफ ॲन्ड लेटर्स " मासिकाच्या मेच्या अंकांत संपादकांनीं यांविषयीं एक सुंदर स्फुट लिहिलें आहे.

ही सफर पूर्वींसारखी मुलुख जिंकायला किंवा नवीन व्यापारी मार्ग शोधायला निघाली नव्हती. तिचा हेतु मानववंशशास्त्रांतील एक नवसिद्धान्त तपासून पाहणें हा होता. ' दि कोन-टिकी एक्स्पीडिशन ' या पुस्तकाचा लेखक आणि त्या सफरीचा संयोजक ' थ्योर हेअरडाइल् ' हा एक मानववंशशास्त्रज्ञ होता. त्यानें अनेक वर्षें पॉलीनेशियन आदिवासींचें जीवन आणि संस्कृति यांच्या अभ्यासांत घालविलीं होतीं. साउथ सी बेटांतील मार्क्वेसस् समूहापैकीं फातुहिवा बेटांत त्याला ज्या एकसंध शिला (monoliths) सांपडल्या त्यांमध्यें आणि पेरूमधील एकसंध शिलांमध्यें फार मोठें साम्य त्याला दिसलें. अधिक संशोधनानंतर त्याला असें वाटलें कीं या बेटावरील पहिले रहिवासी प्राक्-ऐतिहासिक काळांतील अमेरिकन असावेत. पेरुव्हियन व पॉलिनेशियन दंतकथांतहि त्याला साम्य आढळलें; एका कथेंत असें होतें कीं पेरूमधून लोक समुद्रपार गेले, व दुसरींत असें होतें कीं ह्या बेटांवर पहिली वसति समुद्रपारच्या लोकांनीं केली. त्या.









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दोन्ही आदिवासींची एकाच ' Tiki ' सूर्यदेवतेवर श्रद्धा होती. यांतून असा सिद्धान्त निघाला कीं हे मूळचे पॉलिनेशियन दक्षिण अमेरिकेंतून समुद्रमार्गे साउथ सी बेटांवर आले. पण या शास्त्रांतील ज्ञाते तज्ज्ञ हें खरें मानायला तयार होईनात. त्यांचें म्हणणें असें कीं त्या लोकांपाशीं होड्या होत्या असें सिद्ध झालेलें नाहीं. हेअरडाइल्नें उत्तरादाखल असें प्रतिपादिलें कीं त्यांच्याजवळ तराफे होते. आणि तराफ्यांवरून त्या बेटांवर जाणें शक्य आहे हें सिद्ध करण्यासाठीं त्यानें ही अगदीं जुन्या पद्धतीची सफर योजिली. तराफा करण्यासाठीं, प्राचीन काळांत वापरले जाणें शक्य असलेले बाल्सा वृक्षांचे ओंडके त्यानें ॲन्डीज् पर्वत ओलांडून ईक्वेडोरच्या जंगलांतून आणविले. पेरूच्या राष्ट्राध्यक्षांनीं आपल्या राष्ट्राच्या आरमारी गोदींत तराफा बांधण्यास परवानगी दिली. हा तराफा इन्का लोकांच्या अगदीं प्राचीन तराफ्यासारखा झाला, पण तो चालविणारे इंका लोक नव्हते. त्यांना तराफा हाकारण्याची माहितीहि नव्हती. तेव्हां अनुभवानें शिकूनच ते तराफा हाकारूं लागले.

एक लघुलहरींचा बिनतारी संदेशवाहक तराफ्यावर होता, व त्याचें काम हवामानाची माहिती संकलित करून दूर ध्वनिक्षेपित करणें एवढाच होता. तराफ्यावरून समुद्रांतील दुर्मिळ प्राण्यांचे छायालेखहि घेतलेले आहेत. ते या तराफ्यांतून सुखरूपपणें पॉलिनेशियन बेटांवर पोंचले. अर्थातच यानें कांहीं प्राचीन काळच्या लोकांचें समुद्रयान सिद्ध झालें नाहीं. फक्त एवढेंच निश्चित झालें कीं बाल्सा लांकडांचा तराफा समुद्रपार हाकारतां येतो.

या सहा लोकांपैकीं सर्वच चांगले वरिष्ठ दर्जाचे लोक होते. पांच नॉर्वेजियन् होते व एक स्वीड होता. नॉर्वेच्या लोकांचा हा उत्साह मोठा आश्चर्यकारक आहे. त्यामुळेंच त्यांचें हें राष्ट्र हिटलरच्या सत्तेखालींहि नामोहरम झालें नाहीं. एवढ्याशा छोट्या राष्ट्रापासून खंडतुल्य भारतानें पुष्कळच शिकण्यासारखें आहे.

### जपानी बौद्ध-संत निचिरेन

तेराव्या शतकांतील प्रसिद्ध जपानी संत व सुधारक महात्मा निचिरेन याच्या कार्यासंबंधी एक माहितीपूर्ण लेख हिंदी " जीवनसाहित्या " च्या जूनच्या अंकांत श्री. भरतसिंह उपाध्याय यांनीं लिहिला आहे. त्यांतील उद्बोधक भाग संक्षेपानें पुढें दिला आहे :

बाराव्या व तेराव्या शतकाच्या सुमारास जपानांत धार्मिक वादविवाद व संघर्ष झाले आणि अनेक संप्रदाय उत्पन्न झाले. बौद्ध धर्मांत ऱ्हासाचीं लक्षणें दिसूं लागलीं. त्या वेळीं जपानांत चार बौद्ध संप्रदाय होते : ( १ ) शिङ्-गोन संप्रदाय; हा गुह्यमंत्रवादी संप्रदाय होता. याची तुलना भारतीय वज्रयानी बौद्ध धर्माशीं करतां येईल. ( २ ) जोदो संप्रदाय किंवा ' सुखावती ' संप्रदाय. यांत अमिताभ बुद्धाची ( ' अमित बुत्सु 'ची ) उपासना करतात व त्याच्या नामजपानें मुक्ति मिळते असें मानतात. ' सुखापती, नांवानें त्यांनीं एका स्वर्गाची कल्पनाहि करून ठेवलेली आहे. ( ३ ) दिसु संप्रदाय. यांत विनयविषयक नियमांच्या पालनावर विशेष जोर होता, पण यां वेळीं त्यांत केवळ बाह्य कर्मकांडच शिल्लक राहिलें होतें. ( ४ ) जेन संप्रदाय; हा जपानांतील ध्यानमार्गी बौद्ध संप्रदाय म्हणतां येईल. जपानी ' जेन ' शब्द पाली ' झान 'चे विकृत रूप असून त्याचें संस्कृत प्रतिरूप ' ध्यान ' आहे. या संप्रदायांत ध्यानावर विशेष भर असून त्याचा " लंकावतार-सूत्र " नांवाचा मुख्य ग्रंथ होता. तेराव्या शतकांत सामाजिक व राजकीय परिस्थितिहि फारच बिघडली होती. भारताप्रमाणेंच जपानवरहि या शतकांत मंगोल जमातींचीं आक्रमणें चालू झालीं होतीं.

अशा परिस्थितींत निचिरेनचा ३० मार्च १२२२ ला आग्नेय जपानच्या एका बेटांत जन्म झाला. अकराव्या वर्षीं निचिरेनला बौद्ध मठांत शिक्षणासाठीं पाठविलें. पंधराव्या वर्षीं त्यानें भिक्षु-पदाच्या उमेदवारीपर्यंतचें शिक्षण प्राप्त केलें. या वेळेपासूनच त्याच्या ठिकाणीं खरें बुद्धतत्त्व समजून घ्यावयाची, प्रचलित मतांचें सत्यासत्य जाणण्याची आणि प्रत्यक्ष बुद्धत्वाचा साक्षात्कार करून घ्यावयाची दृढ इच्छा उत्पन्न झाली. त्यासाठीं लागणारें अध्ययन, संशोधन आणि साधना त्यानें केली. ध्यान-धारणा केली. ' अमितबुद्ध 'नामाचा जप केला, पण त्याला शान्तता लाभली नाहीं. दहा वर्षें तत्त्वसंशोधन









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

केलें. आणखी दहा वर्षे यांतच गेलीं. शेवटीं तीस वर्षांच्या गाढ चिंतनानंतर निचिरेनला वाटलें कीं सद् वस्तु आपल्या हातीं आली. एके दिवशीं जवळच्या पर्वतशिखरावर प्रशान्त-महासागराच्या दिशेकडून उगवणाऱ्या सूर्यावर दृष्टि एकाग्र करून बसला असतां, त्या भिक्षूच्या वाणींतून एकदम उद्गार निघाला : “ नम्मु-म्योहो-रेङ्गे-क्यो ”= “ नमः सद्धर्मपुंडरीकाय ”. “ सद्धर्मपुंडरीक ” हें एका जुन्या महत्त्वाच्या बौद्ध ग्रंथाचें नांव होतें. निचिरेननें त्याचीं पारायणें केलीं होतीं. या दैवी वाणीच्या घोषणेनंतर त्यानें मठांत एक भाषण करून प्रचलित बौद्ध संप्रदायांचें कठोर परीक्षण केलें, त्यावरून त्याला मठांतून काढून लावून बहिष्कृत करण्यांत आलें. तेथून निचिरेन कामाकुरा मुक्कामीं गेला. कामाकुरा ही लष्करी प्रशासकांची राजधानी होती. या लष्करी राजवटीनें लोक बेजार झाले होते. त्यांत तुफानें, भूकम्प, दुष्काळ, महामारी यांची एका-मागून एक संकटें आलीं. दाही दिशांना लोक मरूं लागले, तरी लष्करी शासकांची उदासीनता गेली नाहीं. तेव्हां जनता व प्रशासक यांना समज देण्या-साठीं निचिरेननें “ रिश्शा-अनकोकु-रोन् ” ( ‘ सत्य आणि देशसंरक्षणाची स्थापना ’ ) नांवाची पुस्तिका लिहिली. त्याच्या या स्वतंत्र बाण्यानें सांप्र-दायिक लोक चिडले. त्यांनीं त्याच्या झोंपडीला आग लावली. अधिकारिवर्गहि त्याच्यावर चिडला होताच. सरकारनें त्याच्यावर शांतताभंगाचा आरोप ठेवून त्याला इजू नांवाच्या द्वीपकल्पांत हद्दपार केलें. तेथें त्यानें खूप हाल-अपेष्टा सोसल्या व तेथल्या जनतेंत जागृति केली. तीन वर्षांनंतर त्याची हद्दपारी रद्द करण्यांत आली.

इ. स. १२६८ मध्यें चीनमधून कुब्लाखान या जुलमी बादशहाचा दूत जपानांत आला व त्यानें सरकारला निर्वाणीचा खलिता दिला कीं ‘ करभार द्या नाहीं तर हल्ला करण्यांत येईल ’, निचिरेननें सरकारला भयसूचना पूर्वींच दिली होती. तिचाच पुनरुच्चार त्यानें जोरानें केला. पण सरकारनें उलट देशद्रोहाच्या आरोपावरून त्याच्यावर खटला भरला व त्याला फांशीची सजा फर्मावली. वधस्थानीं मारेकरी तलवार उपसून त्याला मारणार, तों तेथें एक तेज झळाळून गेल्याचा भास झाला. निचिरेन ‘ नमः सद्धर्मपुंडरीकाय ’ असा जप करीत होता. शिपाई घाबरले, मारेकऱ्यांच्या तलवारी गळून पडल्या. अशा गोंधळांत निचिरेनला मारणें अशक्य झालें व सरकारनें मृत्यूची शिक्षा रहित करून त्याला सोदो बेटांत हद्दपार केलें. तेथें त्यानें अंधश्रद्धेविरुद्ध प्रचार केला आणि भगवान् बुद्धाचा खरा उपदेश ज्यांत आहे त्या ‘ सद्धर्मपुंडरीकसूत्रां ’ चा उपदेशहि तो करीत राहिला. अशीं अडीच वर्षे गेलीं. पुढें एकान्तवास व ध्यानधारणेसाठीं फुजीयामाच्या पश्चिमेस मिनोबू पर्वतावर तो निघून गेला. तेथें तो आठ वर्षे राहिला.

निचिरेन अत्यंत साहसी माणूस होता. मंगोल लोकांचें आक्रमण आलें त्या वेळीं त्यानें त्यांना ‘ तुच्छ मंगोल ’ असें संबोधिलें होतें व जपानच्या उज्ज्वल भवितव्याबद्दल आस्था प्रकट केली होती. हें मंगोलियन आक्रमण निष्फळ ठरलें. आणि देशाचा विनाश टळला. त्या वेळीं जपानमध्यें ‘ सत्यद्वार ’ बौद्ध धर्माची स्थापना झालेली होती. ही त्याला फार संतोषाची गोष्ट वाटली. चीन-जपानच्या परं-परेप्रमाणें ते लोक भारतवर्षाला ‘ इंदूचा देश ’ समजत. निचिरेननेंहि या ‘ इंदु-देश ’ चा उल्लेख केलेला आहे. इ. स. १२७२ मध्यें निचिरेननें ‘ डोळ्यांत अंजन ’ अशा अर्थाचा एक निबंध लिहिला. त्यांत त्यानें आपल्या देशबांधवांनीं कन्फ्यूशियन धर्म, हिंदुधर्म आणि बौद्धधर्म यांचा तुलनात्मक अभ्यास करावा म्हणून अनुरोध केला होता.

निचिरेनच्या चारित्र्यांतील मोठें वैशिष्ट्य म्हणजे त्याची कृतज्ञता व परदुःखाबद्दल सहानुभूति हें होय. त्यानें आपल्या एका शिपाई शिष्याला एक पत्र लिहिलें आहे : ( त्या शिपायानें निचिरेन वध-स्थानाकडे नेला जात असतां त्याबद्दल सहानुभूति दाखविली होती. )

“ मला पक्कें स्मरतें कीं, मला मारून टाकायला घेऊन जात असतां तूं माझ्या मागून येत होतास. तूं माझ्या घोड्याचा लगाम पकडून ठेवलास आणि विलाप करूं लागलास. जिवंत असेंपर्यंत मी हें कसें विसरेन ? जर आपल्या ( पूर्वजन्मींच्या ) पातकांमुळें तूं









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नरकांत पडलास, तर भगवान् शाक्यमुनीनें मला बुद्धत्व घ्यायला आमंत्रिलें तरी मी त्याची आज्ञा मानणार नाहीं आणि निश्चित तूं असशील तेथें नरकांतहि येईन. मी व तूं जर नरकांत असलों तर नक्की शाक्य बुद्ध व 'सद्धर्मपुंडरीक' हि आपल्या बरोबर तेथेंच असतील."

मिनोबू पर्वतावर आठ वर्षें एकान्तांत ध्यान केल्यावर त्यानें आपल्या अंताची तयारी केली. उत्तरेकडे जाऊन तो इकेगामी नांवाच्या स्थळीं पोंचला व तेथें वयाच्या ६१ व्या वर्षी त्याला निर्वाणपद प्राप्त झालें.

## "भागवत" द्वारें लोकशिक्षण

सौराष्ट्र-(काठेवाड) च्या संकृति-जीवनांत श्री. नानाभाई भट्ट यांचें महत्त्व केवढें आहे तें सर्वांना माहीतच आहे. गांधीजींच्या रचनात्मक कार्याच्या तत्त्वाप्रमाणें जनतेला शिक्षण द्यावयाचें कार्य ते आज अनेक वर्षें करीत आहेत. भावनगरच्या "दक्षिणा-मूर्ति" नांवाच्या (भूतपूर्व) संस्थेचे ते मुख्य संस्थापक होते. आतां ते आंबला नांवाच्या खेड्यांत "ग्राम दक्षिणामूर्ति" नांवाची संस्था चालवीत असून त्यांनीं आपलें रचनात्मक कार्य चालू ठेविलें आहे. गेलीं कित्येक वर्षें रामनवमी व कृष्णाष्टमीच्या निमित्तानें ते गुजरात-सौराष्ट्रांतील खेड्यांत भागवत-पारायण करीत असतात. या वर्षी रावनवमीला त्यांनीं सुणाव (जि. खेडा) या गांवीं अशीं पारायणें केलीं. या भागवतकथेच्या द्वारें त्यांनीं हें जें लोक-शिक्षणाचें कार्य चालविलें आहे त्याची कांहीं माहिती "शिक्षण अने साहित्य" च्या जुलैच्या अंकांत आली आहे.

या पारायणप्रसंगीं श्री. नानाभाई स्वतः लिहिलेल्या लोकभागवतांतून निवडक भाग वाचीत. मधूनमधून जे दृष्टान्त भागवतांत येतात त्यांचा हेतु कोणता, त्या मागील दृष्टि काय आहे, हेंहि ते समजावून सांगत. जरूर तेव्हां मूळ संस्कृत श्लोकांपैकीं कांहीं वाचूनहि दाखवीत.

पारायणापूर्वीं सकाळसंध्याकाळ ते गीतेवर प्रवचनें देत आणि खादी, ग्रामोद्योग, मूलोद्योग-शिक्षण आणि गोसेवा यांबाबतींत जनतेनें आचरण्या-सारख्या गोष्टी कोणत्या तें उत्तम प्रकारें समजावून देत.

पारायण ऐकण्यासाठीं सर्वसामान्य श्रद्धाळू लोकांप्रमाणेंच सुशिक्षित लोकहि येत. हरिजन स्त्री-पुरुषहि असत. मूर्तिपूजेसंबंधींच्या वेडगळ समजुती श्री. नानाभाई बरोबर समजावून देत. श्रद्धाळू लोकांना आघात देण्यासहि ते कमी करीत नसत. शास्त्रीय दृष्टीनें खोट्या ठरलेल्या गोष्टी स्पष्ट करून सांगत. शिवाय भयानक प्रसंगांचें वर्णन असलेले, नरक वगैरेंच्या भीषण वर्णनाचे भाग त्यांनीं लोक-भागवतांत गाळले आहेत. कारण त्यांचें असें मत आहे कीं भीति व लालूच यांवर आधारलेल्या गोष्टींनीं शिक्षण किंवा जीवनाची घडण साधणें अशक्य आहे. तसेंच इतरहि ज्या गोष्टी त्यांना योग्य वाटत नसत त्या ते नुसता उल्लेख करून सोडून देत. आपल्याकडे 'ओखाहरण' (उषाहरण) अज्ञानी जनतेंत फार लोकप्रिय आहे. चैत्रांत तें घरोघर वाचलें जातें. पण श्री. नानाभाईंना ही उषाहरणाची कथा वाचण्यासारखी नाहीं असें वाटलें. कारण त्यांत अनिरुद्ध लपून उषेच्या घरीं राहतो, कृष्ण त्याच्या बाजूला असतो वगैरे जें दाखविलेलें आहे तें अयोग्य आहे.

हें पारायण सर्व वर्गांच्या लोकांना पसंत पडलें. त्यावरून असें दिसून आलें कीं धार्मिकता आपल्या लोकांच्या हृदयांत खोल रुजलेली आहे. तेव्हां तिच्यावर बसलेली अंधश्रद्धा, लोकभ्रम वगैरेंची राख उडवून लावून, शिक्षण देणें शक्य आहे. श्री. नानाभाईसारख्या समर्थ व्यक्ती असें काम करूं लागल्यास लोकशिक्षणाचा हा एक मार्ग पुन्हां सुलभ झाला असें होईल.

## सर्वोदय विचाराचें सर्वांगीण स्वरूप

"व्यापारी संघाच्या वार्षिक अधिवेशनप्रसंगीं पंडित जवाहरलाल यांचें एक विस्तृत भाषण झालें. त्यांत त्यांनीं गृह-उद्योगांचें महत्त्व वर्णन करतांना म्हटलें : 'आमच्या कारखान्यांतून फार तर दोन-तीन कोट लोक काम करतील. बाकीच्या लोकांना काय काम देणार ? गृह-उद्योग किंवा लहान प्रमाणा-वर किंवा सहकारी पद्धतीनें चालणारे उद्योगधंदे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

उभे करून बेकार लोकांना काम देऊन त्यांचा पुरा उपयोग करून घेतला पाहिजे. हा एक फार महत्त्वाचा विचार असून तो सर्वोदयविचारक जसा मांडील तसाच मांडला आहे.—पण त्याच अधिवेशनांत श्री. घनश्यामदास बिर्ला यांनीं या विचाराचें खंडन केलें. ते म्हणाले : ' केवळ आधुनिक यंत्रें व कारखाने यांच्या मदतीनेंच संपूर्ण जीविकोपार्जनाची व्यवस्था त्याचप्रमाणें देशाची समृद्धि होऊं शकते. तसें पाहिलें तर चरखा आणि सर्वोदय यांमुळेंहि संपूर्ण जीविकोपार्जन होऊं शकतें. पण लोकांनीं चरखा आत्मसात् केला तर त्यांचें जीवनमान शेवटीं कोठपर्यंत जाईल ? दररोज चार आण्यांपेक्षां जास्त जाणार नाहीं; आणि तेंहि अत्यंत संशयास्पदच आहे. '

" सर्वोदय-विचारधारेचें खंडन इतक्या थोड्या शब्दांत केलेलें माझ्या पहाण्यांत नाहीं. सर्वोदय विचारसरणीनें सर्वांचें जीविकोपार्जन होणार नाहीं एवढेंच नव्हे, तर तिनें सर्वांच्या मरणोपार्जनाची व्यवस्था होईल असा या टीकाकारांचा आशय आहे.

" बापू नेहमीं चरख्याला सूर्याची उपमा देत असत; चरख्याच्या सभोंवार शेती, गोरक्षण, ग्रामोद्योग इत्यादि ग्रहमालेची ते कल्पना करीत. बिर्लाजींचा बापूंशीं निकट परिचय होता. तेव्हां बापूंची समग्र दृष्टि त्यांना चांगल्या प्रकारें माहीत आहे. म्हणून त्यांनीं टीका करतांना चरखा आणि सर्वोदयविचारधारा यांना एकत्र जोडून घेतलें आहे, हें योग्यच आहे. परंतु खंडन करतांना चरख्याला वेगळा काढून त्यावर प्रहार केला आहे !

" पैशाचें मूल्यच ज्या वेळीं स्थिर नाहीं, अशा वेळीं पैशाच्या भाषेंत परिश्रमाचें मूल्य मांडणें चूक आहे. परंतु हेंहि मी सहज सांगूं शकतों कीं, आमच्या केंद्रांतून चरखा चालविणाऱ्या बाईला 'अत्यंत संशयास्पद' चार आणेच नव्हे, उलट निश्चित आठ आणे मिळतातच. परंतु मी वर म्हटल्याप्रमाणें अशा तऱ्हेचें मूल्यमापन करणेंच अशास्त्रीय आहे. —चरख्यानें कापड मिळतें; त्याकरितां कामाच्या वेळापैकीं थोडा भाग द्यावा लागतो. अर्थशास्त्र ज्यांच्या भाषेंत केवळ सक्षम, धडधाकट मजूरच नव्हे तर अक्षम अशा गणल्या गेलेल्या लोकांचाहि चरख्याला उपयोग होतो. म्हणून चरख्याला मी वस्त्रपूर्णा देवी म्हणतों. शेती ही अन्नपूर्णा आहे. महायुद्धापूर्वीं हिंदुस्थानांतील गिरण्यांतून दर माणशीं १७ गज कापड मिळत असे, तें आज केवळ ११ गज मिळतें. एवढें मोठें भांडवल, एवढें बुद्धिकौशल्य आणि एवढी यंत्रविद्याप्रगति असूनहि अशी परिस्थिति आहे. चरख्याची अशी दरिद्री अवस्था नाहीं, हाच माझा दावा आहे.

" शिवाय चरख्याबरोबर कृषि, गोरक्षण, ग्रामोद्योग, ग्रामसफाई, निसर्गोपचार, आणि नवीन शिक्षण यांची जोड दिल्यास सर्वांगपरिपूर्ण जीवन विकसित होऊं शकतें. आज आमचें सरकार आपल्या उत्पन्नापैकीं ६४ टक्के लष्करावर खर्च करतें. या खर्चाची जबाबदारी हिंदुस्थान आणि पाकिस्तान यांमधील वैमनस्यावर टाकली जाते. हा वैमनस्याचा प्रश्न जरी मिटला तरी : जोंपर्यंत ग्रामोद्योगाधिष्ठित अर्थव्यवस्था उभारली जात नाहीं, तोंपर्यंत दुसऱ्या समस्या उत्पन्न होऊन सरकारचें मुख्य लक्ष लष्करावरच राहील. म्हणूनच हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं सर्वोदय विचारसरणी हीच खरी जीविकोपार्जनाची व्यवस्था होऊं शकेल. दुसऱ्या व्यवस्था मरणोपार्जनाच्या होत. "

—आचार्य विनोबा, ' सर्वोदय ' एप्रिल १९५०

' काव्य हा सत्याचा प्रयोग '

' जीवन-गंगा ' नांवाचा एक गोपालकृष्ण कोलतेकृत गीतासंग्रह, (अकोला–वऱ्हाड) आचार्य विनोबांच्या प्रस्तावनेसह नुकताच प्रसिद्ध झाला आहे. त्या प्रस्तावनेंत विनोबांनीं काव्यसत्याबद्दल आपले मौलिक विचार प्रकट केले आहेत, त्यांतील कांहीं भाग पुढें उद्धृत केला आहे :

" तळमळ ही काव्याची शक्ति आहे. तळमळीच्या अनेक जाती असतात म्हणून काव्याच्याहि अनेक जाती झाल्या. पण सर्वत्र तळमळीचें स्वरूप एकच असतें; म्हणून तळमळीच्या काव्याचें रसास्वादन—मग तें काव्य कोणत्याहि जातीचें असो—रसिकांना (त्या रसिकांची काव्यरुचि कोणत्याहि जातीची



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असो ) अवश्य करतां येतें. कवीची इच्छा कशीहि असली तरी रसिकाला आपल्या हौशीचा अर्थ त्यांतून मिळवितां येतो. भक्तिरसाच्या काव्यांतून शृंगार लाभूं शकतो आणि शृंगाररसाच्या काव्यांतून भक्ताला भक्ति लाभूं शकते. वीर-काव्यांत विरक्ताला वैराग्य आढळतें, आणि वैराग्यपर कवितेंतून क्षात्रवृत्तीला वीररस सांपडतो. म्हणून मीं असें ठरविलें आहे कीं, काव्याचें स्वरूप लिहिणाऱ्याच्या मर्जीवर नसतें, वाचणाऱ्याच्या मर्जीवर असतें. पण लिहिणाऱ्याच्या हातांत एक गोष्ट असते. तो नीरस कविता लिहून वाचकाचा विरस करूं शकतो. ह्यानें खुशाल नीरस लिहावें आणि त्यानें सरस वाचावें हें साधायचें नाहीं. ह्यानें शृंगारिक लिहूनहि तो भक्तिमय समजूं शकतो. पण ह्यानें नीरस लिहूनहि तो सरस समजूं शकत नाहीं. पण काव्याचें मर्म जाणणाऱ्यांनीं रस हा काव्याचा आत्मा मानलेला आहे. आणि मला वाटतें, त्यांचें तें कथन बरोबर आहे.

" पण रस म्हणजे काय ? रस म्हणजे शब्दांची आणि अर्थाची नेटकी योजना किंवा ठाकठिकी नव्हे. तें बनावटी रंगीत केळें होईल व त्याला सोनकेळ्याची चव येणार नाहीं. रस म्हणजे तळमळीचा खरेपणा. म्हणून मी म्हणत असतों, खरी तळमळ असूं द्या; मग ती बाह्यविषयवासनेची का असेना मला चालून जाईल. पण ईश्वराच्या नांवाची खोटी तळमळ चालायची नाहीं. परीस लोखंडाचें सोनें करूं शकतो पण पितळेचें करूं शकत नाहीं. तुमच्या हीन तळमळीचें रूपान्तर मी उच्च तळमळींत करूं शकतों. पण तुमच्या खोट्याचें खरें करण्याचें सामर्थ्य मला नाहीं. ' न ये नेत्रीं जळ । नाहीं अंतरीं तळमळ । तों हे चावटीचे बोल ' असें जेव्हां तुकाराम म्हणतो तेव्हां त्याला हेंच म्हणायचें आहे. सत्य हें जीवनसार आहे आणि तो साहित्यरस आहे.

" लोक विचारतात : ' कवीचें जीवन पुण्यमय असलें पाहिजे का ? ' कुणी ह्याचें आग्रहानें उत्तर देतात : ' अवश्य असलें पाहिजे ! ' दुसरे म्हणतात : ' तशी कांहीं गरज नाहीं. ' मला कवीचें पुण्यमय जीवन हवेंच आहे. पण मी ह्या दुसऱ्या पक्षाला दुजोरा द्यायलाहि तयार आहें. मी म्हणतों, कवि पापी का असेना, तो खरा पापी असो म्हणजे झालें; चांगला मन लावून पाप करणारा असला पाहिजे. मधून-मधून पुण्याचा बुरखा घेणारा, पापाचें ढोंग करणारा नाहीं चालायचा. खरा निष्ठावान् पापी पाहिजे. तसा असला तर तो वाटल्यास नरकांत जाईल. पण त्याच्या काव्यानें मी मोक्ष गांठूं शकतों.

" काव्य हा सत्याचा प्रयोग आहे. ज्याच्या जीवनांत जेवढें सत्य मुरलें असेल तेवढें त्यांत काव्य उमटेल. मग तें काव्य तो शब्दांनीं प्रकट करो अथवा न करो. "

---

## राज्यघटनेचें नैतिक अधिष्ठान

केवळ राज्यघटनेपेक्षां ज्या नीतिमत्तेवर राज्यघटना आधारलेली आहे ती नीतिमत्ता अधिक महत्त्वाची आहे. पार्लमेंटरी शासनपद्धति ही जर यशस्वी व्हावयाची असेल तर जनता आणि सरकार अशा दोघांनीहि राज्यघटनेच्या बुडाशीं असलेले नीतिनियम किंवा नीतिसंकेत पाळले पाहिजेत. शासनसंस्थेबद्दल आदर, कायदे पाळण्याची वृत्ति, स्वतंत्र विचार करण्याची संवय, बहुसंख्यांकांच्या निर्णयाचें पालन—हे जनतेच्या बाजूनें पाळावयाचे नीतिनियम होत. सरकारच्या बाजूनें पाळावयाचे नीतिनियम म्हणजे अल्पसंख्यांकांबद्दल आदर, अल्पसंख्यांकांना आपलीं मतें मांडायच्या हक्काला मान्यता, सरकारी कारभार निःपक्षपाती होईल याबद्दल निश्चिति आणि बहुसंख्याकांचा विश्वास नसेल तर आपलें आसन सोडायची तयारी—हे होत. आपल्या नैतिक अधिष्ठानापासून फारकत झाल्यामुळें राज्यघटना शेवटीं अपेशी झाल्या आहेत.

—डॉ. भी. रा. आंबेडकर, त्रिवेंद्रम् येथील भाषणावरून ( जून १९५० )



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई